# श्रीहरिभजनामृत.

## भाग १ ला.





संग्राहक
रा. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर

प्रकाशक
क्षीरसागर आणि कंपनी.



किंमत १२ आणे.

प्रिंटर—कृष्णराव सखाराम पाटकर,
"श्रीलक्ष्मीनारायण" प्रेस ४०२ ठाकुरद्वार, मुंबई.
प्रकाशक—यशवंत रघुनाथ क्षीरसागर
भायखळा, हेन्सरोड चाळ नं. २१४ मुंबई येथें प्रसिद्ध केलें.

पुस्तकें मागविण्याचा पत्ता—

**क्षीरसागर आणि कंपनी,**

बुकसेलर,

भायखळा हेन्सरोड, चाळ नं. २१४.

मुंबई नं. ११.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

आज चार वर्षें आह्मीं बुकसेलरचा धंदा करीत आहों. त्यामुळें महाराष्ट्रांतील लोक नाटकें कादंबऱ्यांचेच भोक्ते नसून चांगलें वाङ्मयही त्यांस आवडतें असें आढळून आल्यावरून आमचे मित्र व प्रसिद्ध महाराष्ट्र-कवि-चरित्रकार रा.रा. जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यांजकडून **श्रीहरिभजनामृत** नांवाच्या पुस्तकाचे तीन भाग तयार करून घेतले. रा. आजगांवकर हे या विषयांत किती पारंगत आहेत हें त्यांना वेळोवेळीं मिळालेल्या बक्षिसांवरून वाचकांस माहीत आहेच. सध्यांचे दिवसांत अशा प्रकारचीं पुस्तकें प्रसिद्ध करणें किती दुरापास्त झालें आहे हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. या पुस्तकास जर चांगला लोकाश्रय मिळाला तर अशा प्रकारचीं पुस्तकें विद्वान् मंडळी-कडून तयार करवून तीं आश्रयदात्यांस अगदीं स्वस्त किंमतींत देण्यांत येतील. चांगल्या प्रकारच्या वाङ्मयाचा महाराष्ट्र समाजांत प्रसार करणें हें आम्ही आमच्या उद्योगाचें मुख्य ध्येय ठरविलें आहे व तदनुसार आमचे प्रयत्नही चालू आहेत. या प्रयत्नास यश येणें हें मुख्यतः महाराष्ट्रातील गुणज्ञ व रसिक जनाच्या सक्रिय सहानुभूतीवर अवलंबून असूनही सहानुभूति आह्मास भरपूर मिळेल अशी आमची खात्री आहे.

मुंबई २६-७-१८.

**क्षीरसागर आणि मंडळी.**

# प्रस्तावना.

महाराष्ट्र-कवि-चरित्र-लेखनाचा उद्योग करीत असतां गेल्या दहावीस वर्षांत बहुतेक सगळया जुन्या मराठी कवींची उपलब्ध कविता मला चाळावी लागली. त्या वेळीं ठिकठिकाणीं अशीं कांहीं सुंदर पद्यें माझ्या अवलोकनांत आलीं कीं त्यांतील प्रसाद, प्रेमळपणा, अर्थगांभीर्य, भाषासौंदर्य, काव्यप्राचुर्य इत्यादि गुणसमुच्चयाच्या निदर्शनानें मी अगदीं वेडावून गेलों. व पुढें मागें त्या सर्व रमणीय पद्यपुष्पांची एक तीन पदरी सुंदर माला गुंफून ती प्रेमळ व रसिक जनास अर्पण करावी असाही विचार मनांत आला. परंतु अनुकूल परिस्थितीच्या अभावीं हा विचार कृतींत उतरविण्याचें काम बरेच दिवस लांबणीवर पडलें होतें. शेवटीं, गेल्या वर्षी या ग्रंथाचा पहिला भाग मोठ्या प्रयासानें छापून प्रसिद्ध केला. छपाईचें काम मनासारखें झालें नसतांही, काढलेल्या सर्व प्रति अवघ्या चार महिन्यांत खपून गेल्या. रसिक विद्वानांनीं व वर्तमानपत्रकर्त्यांनीं ग्रंथांतील पद्यांच्या निवडीविषयीं अनुकूल अभिप्राय व्यक्त केले त्यामुळें उत्तेजन येऊन ग्रंथाचे पुढील दोन्ही भाग मी लवकरच लिहून काढले. परंतु छपाईस लागणाऱ्या द्रव्याच्या अभावीं " उत्पद्यंते विलीयन्ते दरिद्राणां मनोरथाः " अशी स्थिति होते कीं काय या विचारांत, मुंबईतील बहुतेक ग्रंथप्रकाशकांस, ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याविषयीं विनंति केली असतां, हल्लीं कागदाच्या भयंकर महागाईत, हें मोठ्या खर्चाचें व धाडसाचें काम अंगावर घेण्याचें धैर्य एकाच्याही अंगीं दिसेना. बहुतेकांची प्रवृत्ति कादंबऱ्या नाटकांकडेच विशेष दिसली. परंतु " सत्य संकल्पाचा दाता भगवान " या संतवचनाप्रमाणें, माझे मित्र रा. माधवराव रघुनाथ क्षीरसागर, क्षीरसागर आणि कंपनीचे उत्साही मालक यांनीं, माझ्या श्रमाचा योग्य मोबदला मला आगाऊ देऊन हें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें काम हातीं घेतलें व त्याप्रमाणें सदर ग्रंथाचे

तीन्ही भाग सुबक रीतीनें छापून प्रेमळ हरिभक्तांस आज ते प्रेमानें सादर करीत आहेत. पहिल्या भागाच्या प्रथमावृत्तीस महाराष्ट्रांतील रसिकांनीं जसा उदर आश्रय दिला तसाच या तीन्ही भागांस ते देतील अशी प्रकाशकांप्रमाणेंच माझीही खात्री आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागांत बहुतेक सर्व जुन्या मराठी कवींचीं अगदीं निवडक व अत्यंत प्रेमळ अशीं एकंदर २५२ पदें दिलीं आहेत. दुसऱ्या भागांत उत्तर हिंदुस्थानांतील सूरदास, तुलसीदास, नानक, कबीर, मीराबाई वगैरे बहुतेक सर्व जुन्या कवींचीं सुमारें ३२५ निवडक पदें दिलीं आहेत; व तिसऱ्या भागांत महाराष्ट्रांतील सर्व संतकवींचे ४७९ निवडक अभंग दिले आहेत. हीं पद्यें किती सरस आहेत हें त्यांच्या प्रत्यक्षावलोकनानें वाचकांच्या निदर्शनास येण्याजोगें असल्यामुळें त्यासंबंधानें येथें विशेष कांहीं लिहिण्याची आवश्यकता आहे असें वाटत नाहीं; तथापि नुसती भाविकपणाची दृष्टि सोडून केवळ काव्यदृष्टीनें पाहणाऱ्या रसिकांसही हा पदसंग्रह अगदीं तल्लीन करून सोडील अशी माझी खात्री आहे. शेवटीं रा. क्षीरसागर यांचे पुनः एकवार आभार मानून ही प्रस्तावना पूर्ण करितों.

ज. र. आजगांवकर.

मुंबई. ता. २५।७।१८

# पदाची सूची.

# श्रीहरिभजनामृत.

## भाग पहिला.

---:०:---

### पद १. ( हमीर—त्रिवट. )

वंदियला भगवंत । तो म्यां वंदियला भगवंत ॥ ध्रु० ॥ भवसिंधुतारक । निज सुखकारक । सकळां आदि अंत ॥ तो म्यां ॥ १ ॥
सज्जनरंजन । अलख निरंजन । भक्तजनां कृपावंत ॥ तो म्यां ॥२॥
वेद झाले मुके । शेष न स्तवूं शके । ज्याचें रूप अनंत ॥ तो म्यां ॥३॥
नव्हे नरनारी । गैबी सूत्रधारी । हालवि जो जिवजंत ॥ तो म्यां ॥४॥
म्हणे **सोहिरा** अनुभवि पाहणें । चित्सुखवनवसंत ॥ तो म्यां ॥५॥

### पद २. ( भैरवी–त्रिवट. )

चरनरजमहिमा मैं जानी ॥ ध्रु० ॥
याहि चरनसें गंगा निपजे । भगीरथकुलतरनी ॥ चरनरज० ॥१॥
याहि चरनसें अहिल्या उधारी । गौतमकी पटरानी ॥ चरनरज० ॥२॥
याहि चरनसें बिप्र सुदामकूं । कैंचनधाम दिनी ॥ चरनरज ॥ ३ ॥
**मीराके** प्रभु गिरिधर नागर । चरनकमल लपटानी ॥ चरनरज० ॥४॥

### पद ३. ( भूप–धुमाळी )

विठ्ठले रुक्माई ! सांवळे विठ्ठले रुक्माई ! ॥ ध्रु० ॥ नक्रें धरितां गजेंद्रासी श्रम जाले तेव्हां । पिता पुत्र हे आप्त मानुनी गौरविलें सर्वा । परंतु कोणी नये कामा ममता जीवभावा । तेव्हां हें मायिक

जाणुनी आठवले तव पाय ।। १ ।। हरि हरि स्मरतां प्रऱ्हादासी गांजितसे वैरी । शस्त्रें अस्त्रें विष घालुनी अग्नीमाझारी । पिता पुसे "हरि कोठें आहे ?" स्तंभीं गुर्गुरी । प्रऱ्हाद पाचारी नरहरी धांव लौकरी ।। २ ।। सती द्रौपदी पांडवजाया धरोनियां केशीं । सभेसि नेतां दु:शासन तो पापाचा राशी । वस्त्र फेडितां व्याकुळ जाली घाबरली खाशी । मनोदूत धाडिला तुजला आळवी कृष्णमाय ।। ३ ।। पतितपावन करुणासिंधू या नांवासाठीं । युगायुगीं अवतार धरुनियां तारिसि जगजेठीं । अजामिळ ध्रुव वाल्मिक गणिका रिस वानरकोटी । तारावा हा **मुकुंदराज** एवढें अवघड काय ।। ४ ।।

## पद ४.

पतितपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारीं । पतितपावन न होसि म्हणुनी जातों माघारीं ।। ध्रु० ।। सोडीं देवा ब्रीद आतां न होसि अभिमानी । पतितपावन नाम तुजला ठेवियलें कोणी ।।१।। घेसी तेंव्हां देसी ऐसा अससी उदार । काय देवा रोघूं तुमचें कृपणाचें द्वार ।। २ ।। उच्छिष्टाचें शीत न देवा टाकिसि बाहेरी । कोणी दिधली भगवंत तुला भूषणाची थोरी ।। ३ ।। हातीं घेउनि झांगडझेंगा फिरेन त्रैलोक्यीं । पतितपावन न होसि हरि तूं मोठा घातकी ।। ४ ।। **नामा** म्हणे बा तुमचें नलगे मज कांहीं । प्रेम असों द्या हृदयीं तुमचे आठवीन पाय ।। ५ ।।

## पद ५. ( पूर्वी–त्रिवट ).

तुजला मी शरण श्रीपादराज ।। बुडतों भवसिन्धुमाजी तारीं तारीं राखीं लाज ।। ध्रु० ।। भोगियलें सुखदु:ख । पापपुण्य करोनियां ।। नाना योनि हिंडोनियां । नरतनु आलों आज ।। तुजला० ।। १ ।।

दीपपतंगाचे परी। संसाराची प्रीती भारी। तव भक्ति टाकोनियां। विषयाचें करिं काज ॥ तुजला० ॥ २ ॥ तापत्रयवडवाग्नीनें। पोळलों मीं नरहरी। **कृष्णदास** दीनावरी। कृपा करीं महाराज ॥ तुजला० ॥३॥

## पद ६.

कां रे अनाथबंधु येवढें कां केलें निर्वाण। किती अंत पाहशील माझा कंठिं राहिला प्राण ॥ ध्रु० ॥ ब्रह्मादि वंदिती पाय तूं त्रैलोक्याचा धनी। तुझा मी म्हणवितों मजसी चिंतेची कांचणी ॥ १ ॥ सुवर्णाची लंका नेउनि दिधली शरणागता। जगदीश जगन्नायका तुझी कळिकाळावर सत्ता ॥ २ ॥ कामधेनु कल्पतरु क्षीरसागर तुजपाशीं। वितभर पोटासाठीं तोंड वासूं कवणासी ॥ ३ ॥ मुक्तीच्या माहेरा ऋद्धि सिद्धि तुझ्या दासी। क्षीरार्णवा रंक **माळो** मरतो उपवासी ॥ ४ ॥

## अष्टपदी ७. ( राग वसंत ).

ललितलवंगलतापरिशीलन कोमलमलयसमीरे। मधुकरनिकरकरंबित कोकिलकूजित कुंजकुटीरे ॥ विहरति हरिरिह सरस वसंते। नृत्यति युवतिजनेन समं सखि विरहिजनस्य दुरंते ॥ उन्मदमदन मनोरथ पथिक वधूजनजनितविलापे। अलिकुल संकुल कुसुमसमूह निराकुल बकुलकलापे। मृगमदसौरभ रभस वशंवद नवदलमाल तमाले। युवजनहृदयविदारण मनसिज नख रुचि किंशुकजाले ॥ मदन महीपति कनकदंड रुचि केशर कुसुमविकासे। मिलित शिलीमुख पाटलिपटल कृतस्मर तूण विलासे ॥ विगलित लज्जित जगदवलोकन तरुण करुण कृत हासे। विरहि निकृंतन कुंत मुखाकृति केतकि दतुरिताशे ॥ माधविका परिमल ललिते नवमालति जाति सुगंधौ। मुनिमनसामपि मो-

हनकारिणि तरुणाकारणबंधौ ॥ स्फुरदति मुक्तलता परिरंभण मुकुलित पुलकितचूते । वृंदावनविपिने परिसर परिगत यमुनाजलपूते । **श्रीजयदेव** भणितामिद मुदयतु हरिचरण स्मृतिसारं । सरस वसंत-समय वनवर्णन मधुगत मदनविकारं ॥

## पद ८ ( कालंगडा–त्रिताल. )

तो धन्य प्राणी । हरिगुण अतिरस वर्णित वाणी ॥ ध्रु० ॥ नरदेहीं सावध जाला । विवेक हा हृदयीं आला । नित्य निजबोधें धाला । ब्रम्हानंदें निवाला । आत्महित पुरतें ध्यानीं आणी ॥ तो धन्य० ॥ १ ॥ नामरूप मिथ्या भास । ह्मणोनियां धरिना आस । वैराग्यें हा उपजे त्रास । करी निरंजनीं वास । संकल्प विकल्प चित्तीं नाणी ॥ तो धन्य० ॥ २ ॥ अविनाशीं घेतो गोडी । नाशवंत संग सोडी । कल्पना हे समूळ मोडी । मनाच्या अनेक ओढी । पुनरपि न पडे ताणाताणी ॥ तो धन्य० ॥ ३ ॥ भ्रम भेद ज्याचा गेला । निश्चय हा ज्यानें केला । तन्मय होउनी ठेला । जिताचि असतां कीं मेला । अंतीं गति पावला निर्वाणी ॥ तो धन्य० ॥४ ॥ **सोहिरा** म्हणे सारांश । शोधियला शुद्धांश । ज्याणें उद्धरिला वंश । जैसा कीं तो राजहंस । निवाडितो पय आणि पाणी ॥ तो धन्य० ॥५॥

## पद ९.

क्षुधित वनीं गोविंद । अहो बाई, क्षुधित वनीं गोविंद ॥ ध्रु०॥ रवितनयेतटीं शिशुसह साग्रज । चारितो गोधनवृंद ॥ अहो० ॥१॥ यज्ञपतिप्रिय भोजन वांछित । नेणाति द्विजवर मंद ॥ अहो० ॥ २ ॥ ऋषिपत्न्या तुम्ही प्रेमळ सात्विक । तोषवा आज मुकुंद ॥ अहो० ॥३॥ **एका जनार्दनीं** अन्न समर्पुनि । पावाति परमानंद ॥ अहो० ॥४॥

### पद १०. ( उद्धवा शांतवन. )

राम राम बोला वाणी मन लावा राघवचरणीं ॥ ध्रु० ॥ कर्मतत्त्व गहन कळेना, कळलें तरि सांग घडेना। कर्तृताभिमान उडेना कामाचा दोष झडेना। ब्रम्हार्पणबुद्धि जडेना, पुण्याशीं गांठि पडेना। अंधारि निशा उजडेना, हित कोठुनियां आडरानीं ॥ १ ॥ साधूचा संग धरावा नाहीं ज्या आपपरावा। स्वकरें तच्चरण चुरावा हरिमाहिमा श्रवण करावा। प्रेमभाव हृदयिं धरावा कीर्तनीं करा सुगरावा। भवसिंधु सुखें उतरावा जन्माची होय शिराणी ॥ २ ॥ विषय हे विषापरि विटती, स्वयमेव क्लेशही सुटती। वासना मूळही आटती चित्ताच्या वृत्ती तुटती। ज्ञानांकुर हृदयीं फुटती, सहज सर्व संशय फिटती। कर्मबंध सहसा तुटती स्वानंदसुखाची खाणी ॥ ३ ॥ शास्त्रदीप घेउनि निघतां, निगमागम शोधुनि पाहतां। संतासी हितगुज पुसतां सुगम हाचि दावी पंथा। आहेत मतांतर कंथा ज्या रुचल्या नाहीं अनंता। म्हणुनि हाचि **विठ्ठलपंता** पथ गमला निर्मल वाणी॥४॥

### पद ११. ( दादरा )

सदा श्रीहरीचें नाम मुखीं गात जा रे ॥ ध्रु० ॥ वर्णाश्रमविहित कर्म। करणें हा प्रथम धर्म। निरहंकृति कंजनयन। ध्यात जा रे ॥ १ ॥ सत्संगें शास्त्रश्रवण। श्रवणाचें करुनि मनन। निदिध्यासें पूर्ण सुखी। रहात जा रे ॥ २ ॥ निरतिशयं **निजानंद**। हाचि अहर्निशीं छंद। अंतरांगें तोचि जगीं। पहात जा रे ॥ ३ ॥

### पद १२.

ऐका हो अद्भुत देणें त्या एका भगवंताचें ॥ ध्रु० ॥ नेणें पूजा नेणें सेवा। शरणागत मी आलों देवा। म्हणतां देउनियां निज खेवा।

दिधलें स्थान सोन्याचें ॥ १ ॥ केवळ मुग्धाचिये धाटीं । आळी घेतां दुग्धासाठीं । दिधली क्षीराब्धीची वाटी । बाळक धालें विप्राचें ॥ २ ॥ उंचीं बैसायाच्या काजा । निघतां विपिना गाजावाजा । केला अढळपदींचा राजा । निरखी अजूनि जन साचें ॥ ३ ॥ भेटी नेले पोहे मुष्टी । तेणें देवा झाली तुष्टी । आली सौभाग्यासी पुष्टी । झालें कल्याण दुबळ्याचें ॥ ४ ॥ बोले **आनंदाचा बाळ** । होती मुक्याचे वाचाळ । पांगुळे लंघिति पर्वतमाळ । होइल पीयूष विखाचें ॥ ५ ॥

## पद १३.

भक्तांचिया काजासाठीं साधुचिया प्रेमासाठीं सोडिली मी लाज रे ॥ ॥ध्रु०॥ सुयोधना रागावलों । विदुराच्या गृहा आलों । आवडीनें कण्या प्यालों । जोंधळ्याचीं पेज रे ॥ १ ॥ धुतों अर्जुनाचे घोडे । सदां राहें मागें पुढें । झाडीं* अंगणींचे खडे । बांधोनियां माज रे ॥ २ ॥ शुद्ध निरंजनवासी । तो मी आलों आकारासी । पडियलों प्रेमपाशीं । दशाकृति काज रे ॥ ३ ॥ वेडीं गौळियांचीं पोरें । त्यांचें ताक प्यालों बा रे । खातां भिल्लीणीचीं बोरें । उच्छिष्टाची चोज रे ॥४ ॥ पूर्ण ब्रह्म ह्मणती मातें । सर्व ब्रम्ह मीच त्यातें । ऐसियासी जाणीव ते । धरी **अमृतराज** रे ॥ ५ ॥

## पद १४.

कां हो तुम्ही निर्मळ हरिगुण गाना ॥ नाचत आनंदरूपें पंढरीसि जाना ॥ ध्रु० ॥ काय गणिकेचा याती अधिकार मोठा । पापी अजामिळ तोही नेलासे वैकुंठा ॥ १ ॥ ऐसे मार्गे नेणो किती जाले अपरंपार । पंचमहादोषी ज्यांच्या पापा नाहीं पार ॥ २ ॥ पुत्राचिया

---

* “ धर्मगृहिं उच्छिष्ट काढीं ” असाही पाठ आहे.

लोभें नष्ट ह्मणे नारायण । कोण हें कर्तव्य **तुका** म्हणे त्याचें पुण्य ॥ ३॥

पद १५ ( लीलांबरी–दादरा. )

निराकारीं बांधिलें आह्मी घर । निरंजनीं राहिलों निरंतर ॥ १ ॥
नाम आमूचें परब्रम्हवासी । वस्ति आम्हा अखंड चिदाकाशीं ॥ २ ॥
अधिष्ठानीं मिरास केलि आह्मी । म्हणे **केशव** राहिलों सुखधामीं ॥ ३॥

पद १६.

रामा राघवा दीनबंधू रे । तारिं अनाथ कृपासिंधू रे ॥ ध्रु० ॥
माया भवाब्धिजळीं बुडतों रे । नामनौकेमाजि तारिं तूं रे ॥ १ ॥
विषयव्याळें मज डंखियलें रे । गरुडध्वजा गुरू सोडवीं रे ॥ २ ॥
भक्ति विरक्ति ज्ञान नाहीं रे । भवरोगवैद्य त्यांचि पाहीं रे ॥ ३ ॥
**यशवंत** गाय तव कीर्ति रे । नामी ठेवोनि दृढ मती रे ॥ ४ ॥

पद १७.

ऐसें वाटतें मनासि माझ्या उडोनि जावें ते ठायीं । आवळुनि कवळुनि हृदयिं धरावें भेटावें त्या लवलाहीं ॥ लक्ष मंजऱ्या तुळसी-माळा मणभर बुक्का सखे बाई । अर्पण करुनी वेळोवेळां मस्तक ठेवावें हरिपायीं ॥ नाहिं मनाला धीर ग बाई भेटीसाठीं जिव झुरतो। श्रवती डोळे अश्रु वाहती जिव माझा निघुं निघुं पाहतो ॥ आषाढीचा सोहळा मोठा संतमेळा किं ग मिळतो । गरुडपारीं नामकडाका गजर मोठा गर्जतो ॥ मिळाली यात्रा अपरंपार गर्दि मोठी दर्शनाची । माय बहीण विठाबाई कधि भेटेल पंढरपुरची ॥ निढळावरती हात ठेवुनी वाट पाहतें केंव्हांची । माय बहीण विठाबाई कधि भेटेल पंढरपुरची ॥ १ ॥ एकिमेकिचा हात धरोनी प्रदक्षिणेला बाइ जावें । लोटांगण घालुनी आनंदें रंगशिळेवरि नाचावें ॥ वाळवंटावरि उडति पताका

तें सुख डोळ्यांनीं पहावें । वेणूनादें खडकावरती गोडी घ्यावी काल्याची । माय बहीण विठाबाई कधिं भेटेल पंढरपुरची ॥ २ ॥ पंढरपुर वैकुंठ वसविलें भूमंडाळिं ऐसें नाहीं । हाकेसरशीं धाउनि येती भेटे विठोबा रखुमाई ॥ नाथ **नरहरी** ह्मणे **महिपती** तो भरला सर्वांठायीं ॥ सद्गुरुकृपेनें ओळखुनि घ्यावा हा विठ्ठल आपुले हृदयीं ॥ प्रेमळ कीर्तन भक्त करिती आवड ज्याला नामाची ॥ माय बहीण विठाबाई कधिं भेटेल पंढरपुरची ॥ ३ ॥

## पद १८.

आतां मी नये बाई नये बाई पुनरपि या संसारा ॥ ध्रु० ॥ प्रपंच घरधणी घरधणी । वाईट याची करणी ॥ आतां० ॥ १ ॥ सासरा अहंकार अहंकार । जळो याचें घर ॥ आतां० ॥ २ ॥ सासू कल्पना कल्पना । जाच हिचा सोसेना ॥ आतां० ॥ ३ ॥ काम क्रोध हे दीर भावे । जाच किति ग सोसावे ॥ आतां० ४ ॥ आशा तृष्णा ही नणदूली । वाइट हिची बोली ॥ आतां० ॥ ५ ॥ **केशव** स्वामीची निज दासी । शरण मी गेलें त्यांसी ॥ आतां० ॥॥ ६ ॥

## पद १९.

तूं माझा यजमान ॥ रामा ॥ ध्रु० ॥ जननीजठरीं रक्षियलें मज । पोसुनि पंच प्राण ॥ १ ॥ बाहेर निघतां मातेचे स्तनीं । पय केलें निर्माण ॥ २ ॥ ऐसें असतां या पोटाची । कां करुं चिंता जाण ॥ ३ ॥ **मध्वमुनीश्वर** स्वामी रमापति । धरिं माझा अभिमान ॥४॥

## पद २० ( लीलांबरी—दादरा. )

रामनामाची गती कोण जाणे रे । जाणताती कैलासपती राणे रे ॥ ध्रु० ॥ कीट पक्षादी मोक्षपदा जाती । तेथ इतरांची कोण कथा

गाती ॥ १ ॥ व्याधें वधितां मुखासि म्हणे राम । तेणें मिषें तो चढे मोक्षधाम ॥ २ ॥ घेतां रामाचें नाम ग्रामद्वारीं । धन्य जाली ते महिमान्य नारी ॥ ३ ॥ अजामिळादी पूर्ण पापराशी । नामसंकेतें पुण्यलोकवासी ॥ ४ ॥ मंत्र माझ्या शिकविला मायबापें । म्हणे **आनंदतनय** गेलिं पापें ॥ ५ ॥

## पद २१ ( चाल सदर ).

साधुसंतां मागणें हेंचि आतां । प्रीति लागो गोविंदगुण गातां ॥ ध्रु० ॥ वृत्ति शून्या जाहली या संसारा । संतचरणीं घेतला आम्ही थारा ॥ १ ॥ आशा तृष्णा उरल्या नाहिं कांहीं । देहप्रारब्ध भोगितां भय नाहीं ॥ २ ॥ गोड ध्याऊं आठवूं कृष्ण हरी । **दास** म्हणे सप्रेम निरंतरीं ॥ ३ ॥

## पद २२ ( झिंझोटी–त्रिवट. )

कृपाघना तुज कां नये करुणा । शुकसनकादिक वंदिति चरणा ॥ ध्रु० ॥ उत्कंठा मनिं पाय पहाया । लागलि निशिदिनिं जगदाभरणा ॥ १ ॥ अंतरिंचा तूं जाणसि आशय । पूर्ण करिसि कधिं अघसंहरणा ॥ २ ॥ ध्यान भजन मी कांहींच नेणें । **दास** म्हणवितों पतितोद्धरणा ॥ ३ ॥

## पद २३.

गड्यानों ध्या हरिच्या नामा । लिहितां कशासि ओनामा ॥ ध्रु० ॥ परंतु आहे एक वर्म । पहावे भागवती धर्म ॥ दुःखसें प्राप्त होय शर्म । यत्न त्या कशासि रे परम ॥ न पावे हरिवांचोनि क्षेमा ॥ लिहितां० ॥ १ ॥ शरण सद्गुरुला जावें । हरिभजनीं नच लाजावें ॥ हरिचें सगुणरूप ध्यावें । निर्मळ भावें पूजावें । सांडुनि हृदयांतिल

कामा ॥ लिहितां० ॥ ३ ॥ गृहधनजन यांची ममता । धरुनी व्यर्थचि कां श्रमतां ॥ हृदयीं वागवुनी समता । हरिचे चरणांबुज नमितां । नेइल हरि तो निजधामा ॥ लिहितां० ॥ ३ ॥

## पद २४.

धांव रे रामराया । किती अंत पाहसी ॥ प्राणांत मांडियेला । नये करुणा कैसी ॥ धांव रे० ॥ ध्रु० ॥ पाहीन धणिभरी । चरण झाडीन केशीं ॥ नयन शिणले बा । आतां केधवां येसी ॥ धांव रे० ॥ २ ॥ मीपण अभिमानें । अंगिं भरला ताठा ॥ विषयकर्दमांत । लाज न वाटे लोळतां ॥ चिळस उपजेना । ऐसें जालें बा आतां ॥ धांव रे० ॥ ३ ॥ मारुतीस्कंधभागीं । शीघ्र बैसोनि यावें ॥ राघवें वैद्यराजें । कृपा–औषध द्यावें ॥ दयेच्या पद्महस्तें । माझ्या शिरीं ठेवावें ॥ धांव रे ० ॥ ४ ॥ या भवीं **रामदास** । थोर पावतो व्यथा ॥ कौतुक पाहतोसी । काय जानकीनाथा ॥ दयाळा दीनबंधो । भक्तवत्सला आतां ॥ धांव रे० ॥ ५ ॥

## पद. २५ ( भूपाळी ).

उठोनियां प्रातःकाळीं । करूं नामाची आंघोळी । नाम सर्व पापें जाळी । टाळी विघ्न महादोष ॥ १ ॥ नाम वेदांचें हें गुज । नाम मोक्षाचें हें बीज ॥ नामापरतें नाहीं दुजें । साधन आणिक संसारीं ॥ २ ॥ नाम तारी भवसागरीं । नाम दुरितें दुरी करी ॥ नाम विघ्नांतें निवारी । वारी दुर्घट कळीकाळा ॥ ३ ॥ नाम काळाचेंही काळ । नाम निर्मळ प्रांजळ ॥ नाम ध्याये सर्व काळ । **बोधगोपाळ** अहर्निशीं ॥ ५ ॥

### पद २६. ( पिलु--दीपचंदी. )

इस तन धनकी कौन बढाई । देखत नैनोंमे मट्टी मिलाई ॥ ध्रु० ॥ अपने खातर मेहेल बनाया । आपहि जाके जंगल सोया ॥ १ ॥ दहिं दुध खाकर पिंड बनाया । पिंड बनाकर मट्टी मिलाया ॥ २ ॥ हाड जले जैसि लकरिकी मोली । बाल जले जैसी घासकी पूली ॥ ३ ॥ कहत **कबीरा** सुनो मेरे गुनिया । आप मुवे पिछे डुबगई दुनिया ॥ ४ ॥

### पद २७. ( शेजारती ).

पहुडावें पहुडावें देवा ब्रम्हांडशेजे । ज्ञानाज्ञानसहित जाणीव जे ठायीं लाजे ॥ ध्रु० ॥ पिंडिं सकळहि इंद्रियवृंद शोभला मेळा । ब्रम्हरंध्रीं सुखें निद्रा करा गोपाळा ॥ १ ॥ त्रिकुट श्रीहाट गोल्हाटादि सांडुनिया कोठे । औटपीठ लंघुनी ब्रह्मगिरी चोहटे ॥ २ ॥ भ्रमरगुंफा टाकुनि पुनरपि चला सदनासी । जे ठायीं विश्रांति होत पूर्ण मदनासी ॥ ३ ॥ **दयार्णव** स्वामी ऐसे सदनीं पहुडावें । **स्वसु**-खाच्या डोहीं पुनरपि येणें बुडवावें ॥ ४ ॥

### पद २८.

आदिमाया निवृत्ति ज्ञानकळा । प्रणवरूपिणी वेल्हाळा पाहुं डोळां ॥ ध्रु० ॥ जिचें स्वरूप साजिरें दिसे पूर्ण । दृष्ट होइल उतरा **निंब-लोण** ॥ १ ॥ भक्ति चोळी त्यावरी मुक्तिजाळी । उभी असे घेउनी राजबाळी ॥ २ ॥ शांति पीतांबर सावकाश । अखंडित घातला निज कास ॥ ३ ॥ बुगड्या बाळ्या फुलें बिंद्या ल्याली । बोधपैंजण घालुनी रंगा आली ॥ ४ ॥ मुक्त मोतीं अखंड ल्याली असे । मुख-चंद्रमा प्रसन्न तेणें दिसे ॥ ५ ॥ निष्ठाकंकण बांधुनी दोहिं हातीं । ....पाटल्या ल्यालीसे दिनराती ॥ ६ ॥ दंतपंक्तीचा जिकडे पडे रंग ।

तिकडे पाषाण होति पद्मराग ॥ ७ ॥ **केशवाची** स्वामिनी मूळ माता । सुख न समाये निज ब्रह्मिं गातां ॥ ८ ॥

## पद २९.

सांवळिया राधारमणा । कां नये दीनाची करुणा ॥ ध्रु० ॥ किति अंत पाहसी सदया । मनमोहन यादवराया । कशि निष्ठुर केलिस माया । मी शरण आलों तव पाया । येईं झडकरि पन्नग-शयना । कां नये दीनाची करुणा ॥ १ ॥ देवा कृपासिंधु म्हणविसी । अजि क्रूर कां हरी मजविशीं । मां पाहिं हरी हृषीकेशी । हा पतित दीन अघराशी ॥ धांव वेगिं कंजलोचना । कां नये दीनाची करुणा ॥ २ ॥ बहु जन्म संसृति फेरा । चौऱ्यायशीं गणित येरझारा । मोहजाळ ममता भंवरा । मज ओढिती तृष्णा विवरा । कर दया मुर-लिवादना । कां नये दीनाची करुणा ॥३॥ तारिले अजामिळ गणिका । ध्रुव वाल्मिक गजेंद्र गुहका । त्यांहुनि मी पतित हो कां । परि तारि अतां विधिजनका । किति आळवूं भक्तभूषणा ॥ कां नये दीनाची करुणा ॥ ४ ॥ दीनबंधु हें नाम साचें । वर्णिती आगम श्रुति वाचे । अजि सत्य करीं ब्रीदाचें । माउलीपण कृपेचें । **कृष्णदास** लोळे चरणा ॥ कां नये दीनाची करुणा ॥ ५ ॥

## पद ३०.

न्हाणि न्हाणि त्या निर्मळातें न्हाणी । गंगा चरणीं त्यावरी घाली पाणी । भाव नंदचि हे भक्ति यशोदा राणी । न माय गगनीं पायावरी चक्रपाणी हो ॥ ध्रु. ॥ ज्याच्या स्नेहें देहबुद्धिविरहित केलें । ज्याच्या स्नेहें देहाचें मीपण गेलें । ज्याच्या स्नेहें मन तन्मय होउनि ठेलें । त्याच्या मस्तकींचें जावळ माखी तेलें हो ॥ १ ॥ ज्याची प्राप्ति नोहे

नाना अनुष्ठानें । सर्वथाही न लभ्य जो कष्टानें । ज्याचे श्वासीं वेदाचीं अधिष्ठानें । त्याचें नासिक उजळिते अंगुष्ठानें हो ॥ २ ॥ ज्याचे स्मरणें दोषी वैकुंठास जाती । ज्याच्या ध्यानें शिव लाभे परविश्रांती। ज्यातें स्तवितां ते वेद मौनें ठाती । त्याचे भाळीं लावि ती निज चरणाची माती हो ॥ ३ ॥ **कृष्णदास** प्रभु पुत्रातें अवलोकी । मीपण नेउनि उपदेश केला शेखीं । वृत्ति बोलतां चालतां मुकी । त्या कृष्णाचे म्हाणुनी कान फुंकी हो ॥ ४ ॥

## पद ३१.

कुत्ना थमाल ले थमाल आपुल्या गाई ॥ आम्ही आपुल्याला घलासि जातों भाई । येथें म्हायाचा आमचा इलाज नाहीं । तुजी थंगत ले थंगत कलली भाई ! ॥ कुत्ना० ॥ १ ॥ तुम्ही थोलल्या पातलाचे लेंक । तुम्हामधीं ले मी आहें गलीब एक । मदला म्हनतां ले जाई गाई लाख । किति मी धावूं ले कांता लागला पायीं ॥ कुत्ना० ॥२॥ काली पिवली ले गाय आहे तानेली । या या गवल्याची धवली गाय पलाली । मदला बघून ले गवली तो माला माली । काली कामली हिलुन घेतली थाली ॥ कुत्ना० ॥ ३ ॥ कालचा खलवस ले बलाचि गोल केला । तुम्ही अवघ्यांनीं फालफाल घेतला । मी एक निपजत ले म्हणुनि थोलका दिला । तूं म्हणसिल ले याला कलत नाहीं कांहीं॥ ॥ कुत्ना० ॥ ४ ॥ यमुनातीरीं ले नित कलितां आंघोली । मदला म्हणतां ले जा आण शिदोली । कैची आनूं ले वलन आणि भाकली। माजं खेतल ले काम ऐकतं भाई ॥ कुत्ना० ॥ ५ ॥ कृष्ण ह्मणे रे ऐकें बा बोबड्या । तुझ्या गाई रे मी वळीन सौंगड्या । नाहिंतर

वाडिन रे गोपाळांच्या जोड्या । नामा ह्मणे रे गोष्ट रोकडी पाहीं ॥ कृष्णा० ॥ ६ ॥

## पद ३२

कसा तारिल पंढरिराव ! ॥ ध्रु. ॥ भाव धरीना भक्ति करीना । उगाच हरि मज पाव ॥ १ ॥ माता पित्यासी लाथा मारी । मेल्या-वरि करि काय ॥ २ ॥ थर थर कांपे शक्ति हरल्या । म्हणे देवा आतां धांव ॥ ३ ॥ विठ्ठल नामा सद्गुरुचरणीं । दिधला अक्षय ठाव ॥ ४ ॥

## पद ३३.

भक्तजनां सांभाळि सांवळ्या येई रे वनमाळी ॥ ध्रु. ॥ शामसुंदरा जगदोद्धारा । कृपादृष्टि न्याहाळीं ॥ १ ॥ ठाण पहुडे मुरली अधरीं । वाजवी कदंबातळीं ॥ २ ॥ मोर मुगुट शिरि दिव्य कुंडलें । शोभे तिलक भाळीं ॥ ३ ॥ कामक्रोध मदमत्त कालिया । रगडी पायां-तळीं ॥ ४ ॥ आशा मनशा विषयवासना । मोहजाळ समुळीं ॥५॥ गोप–गोधनें वनीं चारितां । दध्योदन करकमळीं ॥ ६ ॥ पापी अघासुर बकी पिंगळा । उद्धरिल्या व्रजबाळीं ॥ ७ ॥ कृष्णाकिंकरा पाहि कृपेनें । अभय हस्तें कुरवाळीं ॥ ८ ॥

## पद ३४.

सांवळिया राधारमणा । कां न ये दीनाची करुणा ॥ ध्रु. ॥ पावन ब्रीद पापी असतां । कां त्यजिलें अनाथनाथा । ये सत्वर धांव समर्था । सोयरिया रुक्मिणीकांता । पतितोद्धारा फणिशयना ॥ कां न ये० ॥ १ ॥ दुर्धर भवसरितांजीवनीं । बुडतों काढीं कर धरुनी । गुण दोष हे क्षमा करुनी । मज तारीं नामस्मरणीं । उन्मद-

भवगजमददमना ॥ कां न ये० ॥ २ ॥ तळमळ बहु वाटे मजला । अभिमान कसा त्वां त्यजिला । मम दुष्कृत पाहुनि थिजला । वास्तव विट आला तुजला । योगीजनमानसहरणा ॥ कां नये० ॥ ३ ॥ नैराश्य होतां माझी । अपकीर्ति होईल तुझी । यावरि कां तुझी मर्जी॥ ऐकें दासाची अर्जी । न करीं आळस अघशमना ॥ कां नये० ॥ ४ ॥ गुरुनाथ नरोत्तमराया । अनिवार तुझी हे माया । सांभाळि हिला यदुराया । आवडि दे तव गुण गाया । गोविंद विनित धरि चरणा ॥ कां न ये० ॥ ४ ॥

## पद ३५.

हे व्रजपति नंदकुमारे सकुमारे कृष्णाबाई ॥ धृ. ॥ तुजविण विकळ जीव होतो क्षण लव पळ स्थिर न राहे । तळमळ बहु वाटे मजला गति कोण करूं मी माये । विश्रांति नसे तुजपरती आयुष्य वृथा सरताहे ॥ चाल ॥ हे यदुपति ये लवलाहें । अतिमृदु मज दाखवि पाये । आलिंगन दे चहुं बाही ॥ १ ॥ सर्वस्वि शरण तुज आल्या परता कधिं केला नाहीं । पुरवोनि प्रीति तयाची कवटाळुनि धरिलें हृदयीं । कनवाळुपणाची थोरी कां केली माझे आई ॥ चाल॥ गुणसरिते सत्वर येई । साष्टांग नमन तव पायीं । सप्रेमें चुंबन देई॥२॥ तान्हें टाकुनि दुर माता लपली त्या कांहीं कळेना । मग काय गती हो झाली त्याची मज आकळेना । लडिवाळ करावा आधीं त्यागितां तोचि टळेना ॥ चाल ॥ प्रीति जडली हे वितळेना । पाहतां तुज तूंहि वळेना । हा देह कदापि जळेना ॥ ३ ॥ न करीं मज पाया-परतः गुरुनाथ नरोत्तमराया । दुस्तर भ्रमरूपी कृष्णा अनिवार तुझी ही माया । अपराधी मी बहु दास्या दुःखार्णवि बुडविं काया ॥चाल ॥

गोविंद प्रभु सुखसदया । करि सर्व सुखाची छाया । सांभाळिं मला यदुराया ॥ ४ ॥

पद ३६ (जन हो श्रीपादपदीं०).

बाई कधिं पाहिन हा वनमाळी । घेईन नव्हाळी ॥ ध्रु. ॥ चिमण्या या गोपसमाजी जेवी । दध्योदन सेवी । असल्या जन्मांतर सुकृत ठेवी । तरी प्रीति करावी । त्यातें ठेवावें या हृत्कमळीं ॥ १ ॥ ज्यातें कवटाळुनि गोपी धरिती । प्रेमें रंजविती । वृंदावनिं रासक्रीडा करिती । हरिमुख अनुभविती । छंदें बिंबोष्ठीं वाजवि मुरली ॥ २ ॥ ज्याच्या पदकमळीं पैंजण साजे । भुवनत्रयिं गाजे । ज्यातें स्तविती धर्मादिक राजे । गंभीरगिरा जे । तो हा भिवरेतिरिं भक्ताजवळी ॥ ३ ॥ सांगूं क्लेशाची कवणा वार्ता । गुरु नरहरिपरता । न दिसे त्रिभुवनिं मजलागुनि पहाता । गोविंद दीनार्ता । सांगा हरिला शरणागत पाळीं ॥ ४ ॥

पद ३७ (धुमाळी).

मंद समिरगति मंजुळ मुरहर वाजवितो पावा । तो हरि मजला दावा ॥ ध्रु० ॥ नम्र करुनि शिर संभ्रम करद्वय जोडुनि सखिचरणीं । मस्तक ठेवी धरणी ॥ शुभ्रवस्त्र जरि तगट जडित घे अचल कुचावरुनी । डोलति कुंडल श्रवणीं ॥ गोमेदोत्पलपाचरत्नमणिहार हृदयभुवनीं । साजे मस्तकिं वेणी ॥ चाल ॥ अरुणापरि कुंकुम भाळीं । वरि मुक्तफळांची जाळी । तांबूल अधरपुटकमळीं ॥ उठाव ॥ मोर जडित मुद राखडी वरि केतक बदरी लावा ॥ तो हरि० ॥ १ ॥ हस्त धरुनि मन स्वस्थपणें करि कस्त पुढें जाया । ते अनयाची जाया ॥ गस्त चुकुनि अलि मस्तपणें श्रीहरिचे पद पहाया । आला-

-पित यदुराया ॥ दुस्तर हा भवसागर सत्वर पतिर उतराया । शुक म्हणे 'परिसें राया' ॥ चाल ॥ गंभीर गिरा करि स्तवन । हंसापरि जिचें गमन । क्षणक्षणा सविस करि नमन ॥ उठाव ॥ शारदेंदु-वदना म्हणती दिठि मुरलीधर पहावा ॥ तो हरि० ॥ २ ॥ विरह-विकळ गळगळ श्रवती द्रुय नेत्र कुचावरती । अधरोष्ठ उभय स्फुरती ॥ वनचर पशु नर वैर त्यजुनि राधेसवतें भ्रमती । पक्षी गज-वज करिती ॥ साधुसंगमीं निमग्न होउनि कृष्णस्मरण करिती । राधेचा श्रम हरिती ॥ चाल ॥ हे मधुमुरनरकविनाशा । स्वामी रे रमाविलासा । निवारिं सकळ भवपाशा ॥ उठाव ॥ श्रीसद्गुरु नरहरि-पदकमळीं **गोविंदा** लावा ॥ तो हरि० ॥ ३ ॥

## पद ३८.

बोल एकदां एकदां इंदुवदने । क्षेम दे मला दनुजकदने ॥धृ० ॥ सजल घन तसा, तसा रंग तनुचा । नाभिं जन्मला जनक मनुचा । न चले तुजपुढें पुढें गर्व अनुचा । मारिला ज्येष्ठ पुत्र दनुचा । ॥ चाल ॥ तेंचि कर कटीं । उभे राहुनि भिवरातटीं । स्वजनासी लक्षी दिठी । दिठी कंसकदने ॥ क्षेम दे मला० ॥ १ ॥ वेष्टिलें कटीं कटीं पीतवसन । हृदयिं द्विजपायाचें भूषण । मकरकुंडलें कुंडलें युक्त श्रवण । पाहतां तुझें वदननलिन ॥ चाल ॥ काम लाजला । शिव-नेत्राग्नित भाजला । होवोनि तनय राजला । राजला पद्मनयने ॥ क्षेम दे मला०॥२॥ तुझ्या स्वरूपाचा स्वरूपाचा चाळा । लागला वृद्ध-तरुण बाळा । होउनी पिसें पिसें आननाला । पाहसि परि न बोलसी त्यांला ॥ चाल ॥ बहुत प्रार्थिती । सुर सकळ तुला विनविती । बोलाया कुंठित मती । मती दर्पहरणे ॥ क्षेम दे मला० ॥ ३ ॥

ऐकुनी तुझी, तुझी कीर्ति ऐसी । अम्हि दुर्बळ फणिपुरवासी ॥
फिरत पातलों पातलों पंढरीसी । तुला देखिलें सुगुणराशी ॥ चाल ॥
बोल एकदां । दे क्षेम चुकवि आपदा । निजसुख भोगवीं सदा ।
**गोविंद** घेत धरणें ॥ क्षेम दे मला० ॥ ४ ॥

## पद ३९.

ऐक ऐक सख्ये बाई । नवल मी सांगू काई । त्रैलोक्याचा धनी तो हा यशोदेसी म्हणतो आई ॥ ध्रु० ॥ देवकीनें वाहिला । यशोदेनें पाळिला । पांडवांचा बंदीजन होवोनियां राहिला ॥ १ ॥ ब्रम्हांडाची सांठवण । योगियांचें निजध्यान । चोरी केली म्हणोनियां उखळासी बंधन ॥ २ ॥ सर्वहि तीर्थें ज्याचे चरणीं । दुर्लभ हा चक्रपाणी । राधिकेसी म्हणतो तुझी करीन मी वेणी फणी ॥ ३ ॥ शरण **एका जनार्दनीं** । मोक्ष कैवल्याचा दानी । गाई गोपी गोपवाळ मेळविल्या आपुलेपणीं ॥ ४ ॥

## पद ४०.

तुझे दे मजला दे मजला । मागतसें हरि तुजला ॥ ध्रु० ॥ संत–समागम जोडी । माझी मीपण वाट मोडी ॥ १ ॥ संत–समागम–अर्चा । सारासार ज्ञानचर्चा ॥ २ ॥ संत घराप्रति येती । भक्ति भावें पुजीन त्यांसी ॥ ३ ॥ भगवद्भजनी जागो । तुझिये स्वरूपी वश्य लागो ॥ ४ ॥ हेंचि मागणें मागे । भावें केशव चरणा लागे ॥ ५ ॥

## पद ४१.

भाव धरा रे । आपुलासा देव करी रे ॥ ध्रु० ॥ कोणी काय म्हणो वाचाळी । बळकट प्रेम असावें गांठीं । किंवा स्तुतिकर आतुनि

काटी । मी तूं हरा रे ॥ आपुलासा० ॥ १ ॥ सकाम साधन सर्वेहि मांडा । निष्कामें मुळ भजनीं भांडा । नाना कुतर्क-वृत्तिसि दवडा । आलि जरा रे ॥ आपुलासा० ॥ २ ॥ दुर्लभ नरदेहाची प्राप्ती । पुन्हा न मिळे हा कल्पांतीं । ऐसा विवेक जाणुनि चित्तीं । गुरुसि वरा रे ॥ आपुलासा० ॥ ३ ॥ केसरिनाथ गुरुचे पायीं । सृष्टी आजि बुडालि पाहीं । शिवदिनिं निश्चय दूसरा नाहीं । भक्तमळा रे ॥ आपुलासा० ॥ ४ ॥

## पद ४२.

नवविध भक्ति घडो । तुझिये स्वरुपीं प्रीत जडो । विषयोन्मुख मन होउनि उन्मन स्वस्वरुपीं मुरडो ॥ ध्रु० ॥ सत्संगति आवडो । पाउल सन्मार्गीच पडो । याविरहित आन मागों जरि तरि जिव्हा समुळ झडो ॥ १ ॥ निजशेजे पहूडो । सुख हें सुखासिंधूंत बुडो । विश्वपटांतरिं तंतु एकची दृष्टि अशी उघडो ॥ २ ॥ पूर्ण रंग जोडो । जगदाभास समुळ मोडो । हारपलें जें निजधन माझें वेगीं मज सांपडो ॥ ३ ॥

## पद ४३ ( बागेसरी—झंपा )

अतां रामपायीं मना लाग वेगें । सोशिले बहुत अन्याय मागें ॥ ध्रु० ॥ जन्मजन्मांतरीं मास नव दाथरीं निरयशेजेवरी उदरकुहरीं । घातले यमपुरीं शिणविलें पापरीं काय सांगूं तरी दुःखलहरी ॥ १ ॥ न निघतां बाहिरी जेंवि बोढे सरी जन्मद्वारीं करी अटक मारी । उपजतां खरी मूत्रसूती धरी रडत कोऽहंस्वरी देहधारी ॥ २ ॥ बाळपण खेळतां तरुण उन्मादता विषयलोलुप्यता चित्त होतें । वृद्धपण आलिया गलित तनु जालिया श्रवण पदे गेलिया स्वहित रहातें ॥ ३ ॥ श्वानसूकर खरा मार्जार वानरा कृमी कीटक घरा पापयोनी । त्यांचिया उदरीं

जन्मलों जेधवां अभक्ष्य तें भक्षिलें न समजोनी ॥ ४ ॥ पुनरपि सांगणें हेंचि तुज मागणें निशिदिनीं जागणें श्रीहरिभजनीं । निगमागम बरें दाविती तें खरें तेंचि तूं आचरें विषय त्यजुनी ॥ ५ ॥ साधुदर्शन पहा सतत भजनीं रहा लाविसी जरि देहा रामकाजीं । रंगसी निजपदीं मोहमायानदी आटली जाण घे भाव माझी ॥ ६ ॥

## पद ४४.

सावध सावध सावध मनुजा निजरुपिं सावध रे ॥ ध्रु० ॥ हिताहित मना न विचारिसि कां झांकुनि नेत्र सदा । कामकर्दमीं लोळसि निशिदिनि मानुनी सौख्य मदा । बीज लवूनि सेरं सुख तेंवी वेगिं घडे आपदा । इंद्रियग्राम विराम पडे मग बोलसि राम कदा ॥ १ ॥ सिंह जळीं प्रतिबिंब विलोकुनि निरखुनि देत बुडी । हंस गगनिंच्या तारा उदकीं घालित तेथ उडी । मूढ कसा मृग नाभि उपेक्षुनि हिंडत बुद्धि कुडी । तेंवि समा हरि सांडुनियां दूर फिरसी देशधडी ॥ २ ॥ इंद्रजाल मृगतोय तसें जग दंभरसें विलसे । स्वप्निं दिसे गज मत्त तुरंगम संभ्रम तेंवि दिसे । क्रूर भवार्णवि कर्णधार गुरु आन उपाय नसे । पूर्णरंग निजरामपदीं मग दुर्गम काय असे ॥ ३ ॥

## पद ४५.

भुलला रे भुलला रे प्राणी भुलला या आभासा रे । आत्मकळा न कळे भ्रमला नर व्यर्थ पराक्रम गेला रे ॥ ध्रु० ॥ श्रुतिपारायण शास्त्रसुभाषित उत्तम पंडित झाला रे । योगकळा सकळा अनुलक्षित वायु समग्रहि प्याला रे । भूतभविष्य गमे समयीं यमनियमहि वश्य तयाला रे ॥ १ ॥ आचरला तप सर्वहि उत्तर दक्षिणी मानस केलें रे । योग-क्रियाविधितें विधिपूर्वक मंत्राराधन झालें रे । आगम साधुनि शक्ति उपा-

श्रुति वैदिक सिद्धिस नेले रे ॥ २ ॥ आसन घालुनि अंतरिक्ष रविमंडळ भेदुनि राहे रे । बोधक शक्ति बृहस्पतिसदृश विक्रम शक्र न साहे रे । साधक बाधक सर्व मुखे पुरुषार्थहि त्रैविध पाहे रे ॥ ३ ॥ क्रूर तप अति आचरला कळिकाळहि दृष्टिस नाणी रे । शूरपणे अमरावति जिंकुनि सत्वर अमृत आणी रे । वाक्य वृथा न वदे सहसा विधि सम्य अनश्रुत वाणी रे ॥ ४ ॥ नित्यानित्यविचार विलोकुनि शुद्ध विराग धरावा रे । भावबळे गुरुराजपदांबुजि आश्रय पूर्ण करावा रे । रंग अभंगचि जनि निज निश्चयभीपण हेत हरावा रे । नेति मुखे श्रुति येथुनि तन्मय शाद्धि निशब्द धरावा रे ॥ ५ ॥

## पद ४६.

नरजन्मामधि नरा करुनि घे नरनारायण गडी । तरीच सार्थक मानवकुडी ॥ ध्रु० ॥ बा लक्षचौऱ्यांशी वेळ संसार पडल्या गळां । चिंतेचा पिकला मळा । दार धनाचा लोभ टाकुनी झडकरि हो वेगळा । हा कसा उकळिशी पिळा । धनानिमित्त जनापुढे तूं दाविसि नाना कळा । किति तुला मुलांचा लळा ॥ चाल ॥ तूं पडुं नको याचे भरीं । तुझ्या हें खापर फुटतें शिरीं । तुला मी गोष्ट सांगतों खरी । आतां कर तांतडी । ही पुनः नये बा घडी ॥ नरजन्मामधि० ॥ १ ॥ निपट बावळा या विषयांच्या मागें लागसि कसा । कां होसी वेडा पिसा । वयोधनाची किति चंचळ गति कां धरिसी भरंवसा । हें सकळ मनाला पुसा । उदरासाठीं दुर्जनिकांच्यापुढें पसरिसी पसा । किति उगाळशिल कोळसा ॥ चाल ॥ हें तुला सुचविलें कुणीं । दयाळू नर नारायण धणी । अजुनि तरि करि कां हीं घोकणी । विषवल्लीची जडी । तूं म्हणशील साखर खडी ॥ नरजन्मामधि० ॥ २ ॥

नवमकामना करूनि मनामधिं स्मणशिल पुरुषोत्तमा । दे सतत विपुला रमा । विषयवासना तुला नुटेना मानसि या संभ्रमा । काय पुढें बोलशील अधमा । किती प्रपंचामध्यें फिरुनियां पावसि विकल श्रमा । कां न करिसि भजनोत्तमा ॥ चाल ॥ हें कर्म तुला भावलें । करावी अचळा दारा मुलें । मिळेना पुढती हें बाहुलें । कविरायाची घडी । दाविल भवार्णवाची थडी । नरजन्मामधिं० ॥ ३ ॥

## पद ४७.

सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं । सज्जनवृंदें मनोभावें आधी वंदावीं ॥ ध्रु. ॥ संतसंगें अंतरंगें नाम बोलावें । कीर्तनरंगीं देवासन्निध सुखें डोलावें ॥ १ ॥ भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या । संतासंगें वैराग्याच्या गोष्टी विवराव्या ॥ २ ॥ जेणेंकरोनी मूर्ति ठसावी अंतरिं श्रीहरिची ॥ ऐसी कीर्तनमर्यादा हे संतांचे घरची ॥ ३ ॥ अद्वयभजनें अखंड स्मरणें वाजवि करटाळी । एकाजनार्दनीं मुक्ती होय तत्काळीं ॥ ४ ॥

## पद ४८.

पोटापुरतें देईं । मागणें लई नाहीं लई नाहीं ॥ ध्रु० ॥ पोळी साजुक अथवा शिळी । देवा देईं भुकेच्या वेळीं ॥ १ ॥ वस्त्र नवं अथवा जुनं । देवा देईं अंग भरून ॥ २ ॥ देवा कळणा अथवा कोंडा । आम्हा देईं भुकेच्या तोंडा । तुका म्हणे आतां । नका करूं पायापरता ॥ ४ ॥

## पद ४९.

बोलणें फोल झालें । डोलणें वायां गेलें ॥ ध्रु० ॥ चित्ती विषयाचा अभिलाष । नाहीं विश्रांतीचा लेश । मुक्ते म्हणे निर्विशेष । परब्रह्म

सांचलें ॥ १ ॥ श्रवणीं दावी अद्वैहि भाव । म्हणे मृगजळवत् हें वाव । कवडी वेंचितांही जीव । जाऊं पाहे तळमळुनी ॥ २ ॥ परोपदेशी पूर्णज्ञानी । वाहे मत्सर ममता मनीं । नागसुरें तो जैसा फणी । डोले परी विष वदनीं ॥ ३ ॥ अन्न म्हणतां कोण धालें । शब्दें ब्रह्म कोण झालें । शिकविले बोल बोले । शुक पक्षी पैं जैसा ॥ ४ ॥ शिकला नाना कळा छंद । नाहीं अंतरीं निर्द्वंद्व । सहज पूर्ण निजानंद । सर्व रंगीं न भासे ॥ ५ ॥

## पद ५०.

भज रे गोविंदा गोविंदा । सच्चिदानंदकंदा । सावध होई रे मतिमंदा । न करीं आणिक धंदा ॥ ध्रु० ॥ मोहें भुललासी भुललासी । माझें माझें म्हणसी । क्लेशें मेळविल्या धनराशी । अंतीं टाकुनि जासी ॥ १ ॥ गृहसुत धनदारा धनदारा । मिथ्या मोह पसारा । अंतीं जाशिल रे झरारा । करिं कां पूर्ण विचारा ॥ २ ॥ आयुष्य जातें रे घडी घडी । तुज विषयांची गोडी । काळ पाडिल रे मुरकुंडी । तैं तुज कोण सोडी ॥ ३ ॥ विसरुनि भगवंता भगवंता । करिशिल घरची चिंता । काळ नेइल रे अवचिता । तंव तूं पडशिल भ्रांता ॥ ४ ॥ गुंडा केशवीं स्थिर राहे । तरीच तुझी सोये । पायां लागलिया पैं पाहे । अंतीं मोक्ष लाहे ॥ ५ ॥

## पद ५१.

एक मीच प्रियकर ज्याला । माझें हो आयुष्य त्याला ॥ ध्रु० ॥ कृष्ण म्हणे अर्जुनातें । माझें मद्भक्तासी नातें । जैसा मीन जळीं जीवनातें । जीवें भावें न विसंबे ॥ १ ॥ मजवेगळें दुसरें कांहीं । त्रिभुवनिं जयासि उरलें नाहीं । त्याविण क्षण लव पळ मज नाहीं ।

उदास अनंत ब्रह्मांडें ॥ २ ॥ इंद्रपदींचे जे उपभोग । त्याचे दृष्टी ते क्षयरोग । माझे स्वरुपीं अखंड योग । वियोग नाहीं मज त्यासी॥३॥ ऋद्धि सिद्धि मुक्ति चारी । द्वारीं वोळंगति कामारी । देखुनि वांतीचिये परी । अखंड रत हरि-गुरु-भजनीं ॥ ४ ॥ काया वाचा मनें चित्तें । अनन्य भावें भजती मातें । त्यांचा सर्वही मी अच्युतें । योगक्षेम वहावा ॥ ५ ॥ विश्वात्म्याचे आत्मे झाले । पूर्ण **निजानंदीं रंगले** । त्यांसी म्हणतां मेले गेले । ते भ्रांतांचे शिरोमणी ॥ ६ ॥

## पद ५२.

मना ऐसा महाराज कोण आहे रे । नाममात्रेंची जन्मजरा जाये रे ॥ ध्रु० ॥ मच्छ कच्छ पशु सूकर जाहला रे । नारसिंह अवतार धरियेला रे । अजामेळी परम सुखी केला रे । अर्जुनाचा सारथी स्वयें झाला रे ॥ १ ॥ धरी भक्तांचे उरीं शिरीं पाय रे । पुरी नेली वैकुंठपदा पाहे रे । भिल्लिणीचीं उच्छिष्ट फळें खाये रे । रिसां वानरां एकांत करिताहे रे ॥ २ ॥ दीनवत्सलता काय किती वानूं रे । पार्थालागीं लपविला दिवसा भानू रे । वृंदावनीं वाजवी रम्य वेणू रे । तेणें नादें मोहिल्या गोपि धेनू रे ॥ ३ ॥ अनंत कोटी ब्रह्मांडें ज्याचे पोटीं रे । तो हा भावें गोवळ्या धेनुपाठीं रे । खांदां कांबळा घेवोनि हातिं काठी रे । **निजानंदें रंग**ला पाठि पोटीं रे ॥ ४ ॥

## पद ५३.

जैसें ज्याणें केलें । तैसें त्याला फळ झालें । ऐसें अनुभवासी आलें । वांत जाबुवें काय गेलें ॥ ध्रु० ॥ चोर जार रांडा पोरें । निंदा द्वेषी चहाडखोरें । त्याला बांधुनि यमदूतांनीं अघोर नरका नेलें ॥ १ ॥ काळ ज्याळ हा त्रिकाळ । डंखूं पाहे सर्वहि काळ । त्याचें भय सांडुनियां

मूर्खें स्वहित टोलाविलें ॥ २ ॥ भक्त विरक्त योगी संत । सिद्ध ज्ञानी जीवन्मुक्त । त्यांची सेवा करुनी देवें वैकुंठासी नेलें ॥ ३ ॥अर्थ स्वार्थ साधन अर्थ । केसरि **शिवदिन** गुरु परमार्थ । गुरुभक्तांचें गुरुभक्तीनें जन्ममरण चुकवीलें ॥ ४ ॥

## पद ५४.

उगाचि कां उडशी बा कां उडशी ॥ आपहडोहीं बुडशी ॥धृ०॥ रक्तमांस कीं हाडें । यांत सोंवळें न दिसे गाढें ॥ १ ॥ शिरा नाडि चर्माचा । पुतळा द्वैतसंग कर्माचा ॥ २ ॥ क्रोध काम गुणवृत्ति । विटाळ नामरूप प्रवृत्ति ॥ ३ ॥ संशय अंतरिं वागे । मीपण घातक पातक जागे ॥ ४ ॥ **शिवदिन** केसरिपाया—। वांचुनि दंभ सोंवळें वायां ॥ ५ ॥

## पद ५५.

नय कामयाचें आत्मानुभवी योगिया ॥ धृ० ॥ देह—अहंभाव त्यागी । मृत्यु मारुनियां अंगीं । देव आपणचि झालिया ॥ १ ॥ योग कर्मानें गाळी । ज्ञान संशयातें टाळी । आपुल्या ठायासी आलिया ॥ २ ॥ पूर्णानंदें पूर्णपणीं । दृश्यातें दृष्टि नाणी । **शिवरामचि** होउनि ठेलिया ॥ ३ ॥

## पद ५६.

उद्धवा शांतवन कर जा त्या गोकुळवासि जनांचें ॥ धृ० ॥ बा नंद यशोदा माता मजसाठीं त्यजितिल प्राण । त्यागुनी प्रपंचा फिरती मनिं उदास रानोरान । अन्नपाणि त्यजिलें रडती अति दुःखित झाले दीन ॥ चाल ॥ जन्मलों तेंहुनी झटले । मजलागीं तिळतिळ तुटले । कटि खांदिं वाहतां थटले । आटलें रक्त देहाचें ॥

उद्धवा० ॥ १ ॥ आइबाप त्यजुनी बाळें मजसंगें खेळत होती । गोडशा शिदोऱ्या आणुनी आवडिनें मजला देती । रात्रंदिस फिरले मागें दधि गोरस चोरूं येती ॥ चाल ॥ मी तोडुनि आलों तुटका । तो जिवा लागला चटका । मजविण त्यां युगसम घटका । आठवतें प्रेम जयांचें ॥ उद्धवा० ॥ २ ॥ पतिसुतादि गृहधन त्यजिलें मजवरती धरुनी ममता । मानिलें तुच्छ अपवर्गा मजसंगें निश्चळ रमतां । मत्प्राचित्त त्या गोपी नेत्रांतरिं लेवुनि समता ॥ चाल ॥ तिळतुल्यहि नाहिं मनिं डगल्या । दृढनिश्चय धरुनी तगल्या । बहुधा त्या नसतिल जगल्या । भंगले मनोरथ ज्यांचे ॥ उद्धवा० ॥ ३ ॥ हरि आहे सत्स्वरूप म्हणोनि भेटतांचि त्यां सांगावें । सांग कीं समस्तां पुशिलें प्रत्युत्तर त्यां मागावें । करुनियां ज्ञान तयांतें सांग कीं शोक त्यजावे॥ चाल ॥ हें कार्य नव्हे तुजजोगें । मजसाठीं जावें वेगें । हें **मध्वमुनीश्वर** सांगे । त्यां नावे ज्ञान जयांचें ॥ उद्धवा० ॥ ४ ॥

## पद ५७.

चिंतावा रघुवीर । प्राण्या ॥ध्रु०॥ नासिक त्रिंबक रूप मनोहर । पावन गंगातीर ॥ प्राण्या० ॥ १ ॥ पंचवटीमध्यें पर्णकुटी करीं । सेवुनि राहें नीर ॥ प्राण्या० ॥ २ ॥ लौकिक लज्जा सांडुनि अवघी । पांघर भगवें चीर ॥ प्राण्या० ॥ ३ ॥ मधुर हरीच्या नामाविरहित । न रुचे साकर क्षीर ॥ प्राण्या० ॥४॥ **मध्वमुनीश्वर** ह्मणतो येथें । चित्त करावें स्थिर ॥ प्राण्या० ॥ ५ ॥

## पद ५८.

सगुण गुण माया । आलि कोल्हाटीण खेळाया ॥ ध्रु० ॥ प्रपंचाचा रोविला वेळू । महाशून्यांत मांडिला खेळू । ब्रह्मा विष्णु जियेचे

बाळू । चला जाउं पहाया ॥ आलि०॥१॥ आला निर्गुणाचा कोल्हाटी । सोहं शब्द ढोलकें पिटी । उघडुनि चैतन्याची ताटी । चला जाउं पहाया ॥ आलि० ॥ २ ॥ त्रिकुट श्रीहाट गोल्हाट । वरी साधिलें औटपिठ । भ्रमरगुंफेचा शेवट । चला जाऊं पहाया ॥ आलि० ॥ ॥३॥कोल्हाटिण बैसलिसे डोळां ॥ जाणे गुरुपुत्र आगळा॥ नरहरि बोधाचिया लिळा ॥ चला जाउं पहाया ॥ आलि० ॥ ४ ॥

## पद ५९.

या दुःखरूप संसारीं । हरि मज तारीं ॥ ध्रु० ॥ मी माझें हें कैसें होईल । चिंता निशिदिनिं मारी ॥ १ ॥ भजन पूजन इत्यादिक न घडे । इंद्रियें व्याकुळ सारीं ॥ २ ॥ अनन्य भावें पडि शरणागत । नरहरि हांका मारी ॥ ३ ॥

## पद ६०.

क्षमा करी अपराध सख्या रे किंतितरी विनवूं तुला । दे भेट विठोबा मला ॥ ध्रु० ॥ दामाजीनें धान्य लुटविलें वांचविली पंढरी । त्याचा भार वाहे शिरीं ॥ जाउनिया बेदरासि यवनालागीं मुजरा करी । याला काय ह्मणावें तरी ॥ भक्तजनांची माय कृपाळू कळवळ आली तुला ॥ दे भेट० ॥ १ ॥ स्तंभीं बांधुनि गृहीं टाकिलें विचार केला नाहीं । गेली यात्रेला सखुबाई । तिच्या पतीची सेवा केली बसुनि पलंगीं पायीं । तुझे अंगी देवपण नाहीं ॥ सखू आण ग पाणी मासू घागर देई तुला ॥ दे भेट० ॥ २ ॥ जनाबाईनें दळण दळाया तुज कैसें लाविलें । त्वां न्हाउं कसें घातलें ॥ एकांतीं बैसुनी प्रीतिनें उच्छिष्ट त्वां भक्षिलें । तें तुझें प्रगट कोणें नेलें ! ॥ वाकळ पांघरुनि उभा राहसी शोभा

आली तुला ॥ दे भेट० ॥ ३ ॥ राधाबाई कोण निघाली सुईण ते होउन । कर्म केलें बाळंतपण ॥ **नाथ नरहरी** म्हणे **महिपती** लीन झाल्यावांचुन । तुजा दयाळ म्हणेल कोण ॥ संतांघरचें काम करितां कळवळ आली तुला ॥ दे भेट० ॥ ४ ॥

## पद ६१.

कर साधूचा संग ॥ सुखकर ॥ ध्रु० ॥ क्षणभंगुर तनु जाणुनि हरिगुण- । श्रवणीं कीर्तनिं रंग ॥ १ ॥ जाईजणें हें सर्वहि जाइल । गजरथ धेनु तुरंग ॥ २ ॥ वस्त्रभूषणें कैंची अंतीं । कोठें छपर-पलंग ॥ ३ ॥ **आत्मारामीं** बोध ठसावुनि । दृढतर राहि अभंग ॥ ४ ॥

## पद ६२.

तो हरि असतां कां करुं चिंता ॥ ध्रु० ॥ शुक कोणीं केले हिरवे रे । मोर विचित्रहि ते बरवे रे । हंस धवल कोणा करवे रे । अप्याखर्गासा मिरवे रे ॥ १ ॥ अश्म शिरे आणि गर्भ तो वाढे । अग्निवरी उदकाची झाडें । पाहतां एक एकेक निवाडे । ख्याति अशीच असंख्य पवाडे ॥ २ ॥ आकाशा अवकाश जयाचा । परमाणूंतही वास तयाचा । अक्रिय नित्य सखा हा दयेचा । निधि **श्रीधर** शुभ गुण उदयाचा ॥ ३ ॥

## पद ६३.

सखया रामा विश्रांति तुझिये नामीं । म्हणवुनि मजला ने त्वरें निजसुखधामीं ॥ ध्रु० ॥ अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी । पशु-सुत जाया धनधामीं प्रीति मोठी । माझीं माझीं म्हणुनियां धरिलीं पोटीं । यांच्या संगें भोगिल्या दुःखकोटी ॥ १ ॥ सोडुनि स्वहिता धावलों दिशा दाही । शववत झालों मागुता कौतुक पाहीं । परि खळ

जन हे नेदिती कवडि तेही । परि हे आशा पापिणी लाजत नाहीं ॥ २ ॥ जंववरि दृढता तंववरि या तनुची प्रीति ।। जर्जर झाल्या निंदक हे अवघे होती । यांचीं दुःखें तुजला मी सांगूं किती । म्हणुनि येतो **श्रीधर** काकुळती ॥ ३ ॥

## पद ६४.

कां रे करुणा तुला येइना कितितरि विनवूं हरी । कैसा मज अति हीनदीन परि केला जगदंतरीं ॥ ध्रु० ॥ तुजविण जिव तडफडतो व्याकुळ धीर धरावा कसा । आश्रित मी प्रतिपाळक तूं जननीप्रति बाळक जसा ॥ नसे कोणि सहकारि जनांचा किमपि नाहिं भरंवसा । उपहासिति परि दिसे न कोणी पक्षपात करि असा । भाग्यहीन झाल्या जनांमधि पडुनि बोलतो पिसा । दशा ज्यासि तो सहजचि शाहणा मान्य होतसे ठसा ॥ चाल ॥ बहु वित्त नसे सद्गृहीं श्रीधरा रे । विद्या न धार्मिक संग्रहीं श्रीधरा रे ॥ पडिलो या भवनिग्रहीं श्रीधरा रे ॥ उठाव ॥ कर्म मार्ग न घडे तव सेवन अर्चनादि निज घरीं । सदा आळशी आनयमय स्थळूण न वदे वैखरी ॥ १ ॥ घाबरतो हा आत्मा याची कांहि कळ तुज येइना । स्वदंश हा स्वद्वाक्य साक्ष भगवद्गीता परकि ना ॥ निळनिळ गोष्टिसाठिं शरण किति जावें कीं लघु जनां । घटे महत्त्व परंतु तुटेना आस कार्य होइना ।। वृथा द्वेष धरुनिया पाहती छिद्र कोणि झांकिना । त्यावया श्रीपति न सांपडे स्थळ कोठें तुजविना ॥ चाल ॥ का दगदग माझ्या जिवा माधवा रे । न पडेच चैन निशिदिवा माधवा रे ; करुं काय मी हरहर शिवा माधवा रे ॥ उठाव ॥ कशी फजीती मांडियासि कां कोपसि दासावरी । विटंबितो मी यांत काय संतोष तुझ्या अंतरीं ॥ २ ॥

तूं करुणेचा सागर त्यांतुनि बिंदुमात्र कां नसे । असा काय अन्याय सख्या हरि तुजप्रति माझा दिसे ।। कीं अदयाग्नीनें करुणेचें शोषण केलें असे । म्हणुनि उगा राहशी ऐकुनि बौद्धरूप युगवशें ।। याचि युगीं कैकांशि तारुनी संकट वारित असे ।। अतां काय सोडोनि बैसलां तें विरुद्ध हो कसें ।। चाल ।। मी दास म्हणवितों तुझा केशवा रे । नको भाव आठवूं दुजा केशवा रे । मज दुर्बळाचि हे पुजा केशवा रे ।। उठाव ।। शरणागत सर्वस्व ठेवितों मस्तक चरणावरी । किती अंत पाहशील कृपाळा धांव धांव झडकरी ।। ३ ।। दाही बोटें मुखीं घालितों पदर पसरतों तुला । क्षमा करीं सर्वापराध तूं नको उपेक्षूं मला ।। असेंचि तुज कर्तव्य तरी हा देह कां रे निर्मिला ।। रिझ सोंगा या कीं न आणवी हे अनुचित नटकला ।। पदोपदीं चुकविसी बुद्धि कां रोष अंगिकारिला । तुझेंचि तुज हीनत्व तूंचि कर्त्ता लोकत्रय भला ।। चाल ।। अधिकार नाहिं मजकडे रांघवा रे । ना स्वतंत्रता मज घडे राघवा रे । नको लावुं खळांचे खडे राघवा रे ।। उठाव ।। गगन कडकडुनि पडे संग मी तुझा सोडिना तरी । बोलवेना राघवाशि देवा जें इच्छिशि तें करीं ।।४।।

## पद ६५.

पुरे नाम संसृती तराया कशासि जपतप फार रे ।। ध्रु० ।। रा म्हणतां पापक्षय होउनि मकारासि उच्चार रे ।। १ ।। उफराट्या उच्चारें जाला वाल्मिकिचा उद्धार रे ।। २ ।। श्वपचादिक हे वदतां होती रामरूप निर्धार रे ।। ३ ।।

## पद ६६.

मर्जी देवाची देवाची । मिथ्या धांव मनाची ॥ ध्रु० ॥ मनांत येतें हत्तीघोडे पालखींत बैसावें । देवाजीचे मनांत याला पायिं चालवावें ॥ १ ॥ लोड तिवाशा नरम बिछाना सुंदर कांता व्हावी । देवाजीच्या मनांत याच्या पाठिं कर्कशा लावावी ॥२॥ महाल मुलुखमे पूर्ण खजीना घरांत पैका व्हावा । देवाजीच्या मनांत याला दरिद्रि ठेवावा॥३॥ बल्लव ह्मणे मनांत येतें कांहीं न करावें । अहोरात्र सोडुनि धंदा देवा आळवावें ॥ ४ ॥

## पद ६७.

केला राम धणी राम धणी । अघटित ज्याची करणी ॥ ध्रु० ॥ रामीं रतली वाणी । आतां सुखास काय वाणी ॥ १ ॥ रामावांचुन कांहीं । आणिक साधन उरलें नाहीं ॥ २ ॥ कोकिळ प्रभुसी ध्यातां । आलें सहजीं निजपद हाता ॥ ३ ॥

## पद ६८.

हरि हा आपणची जग झाला ॥ ध्रु० ॥ आपणचि देव भक्तहि होउनि पूजित आपणाला ॥ १ ॥ उत्तम अधम योनि जितक्या जीवरूपें भरला ॥ २ ॥ सर्वं खलु इति कृष्ण दयार्णव श्रुति वदती त्याला ॥ ३ ॥

## पद ६९.

कौसल्या म्हणे बा रामा नको वना जाऊं जाऊं । माझिया रे तान्ह्या बाळा तुला कोठें पाहूं पाहूं ॥ ध्रु० ॥ अयोध्या ही ओस पडली तुझ्यावीण आजि रामा । मला गमेना कीं कांहीं साधुजन-

मनविश्रामा। श्रावणारि मूर्छित पडला आग लागो तुझ्या कामा। किती तुझ्यामागें मागें कोठवरी धावूं धावूं ॥ १ ॥ हरणीचें पाडस वनीं चुकलें गे बाई बाई। तैसें मन झालें रामा रडतें मी धाई धाई। नको आतां टाकुन जाऊं मजकडे पाहीं पाहीं। तुजसाठीं रामा आजी विष कीं मी घेऊं घेऊं ॥ २ ॥ स्तनीं फुटलासे पान्हा बाळा जवळि येईं येईं। किती कष्टविशी मजला सुखी गृहीं राहीं राहीं। त्यजुनियां राज्य ऐसें वनीं कांहीं नाहीं नाहीं। कैकयीचे सदनीं कैशी एकटी मी राहूं राहूं ॥ ३ ॥ सीता ही स्वरूपानें अति सकुमार खाणी। खडे रुततील तिजला वनीं माझे मायबहिणी। तृषाक्रांत झाल्या रामा उभा रहा पाज पाणी। चतुर्दश वर्षें दुःख कोठवरी साहूं साहूं ॥ ४ ॥ वनीं करीं साउलिये दिनकरकुळदीपा। सरोवर जवळी ठेवीं वरुणा तूं मायबापा। पदोपदीं रक्षीं तान्ह्या नव्हे वनवास सोपा। निशिदिनीं **माधव** तुझे गुण सदा गाऊ गाऊ ॥ ५ ॥

## पद ७०.

भूक मोठी मज लागली देवा भोजन देईं। याचक मी तुझे द्वारींचा वेगीं प्रसन्न होईं ॥ ध्रु० ॥ सहजस्थितिची गुळवरी स्वानंदाचा मांडा। वैराग्याची कढी पातळ नामी शाका उदंडा ॥ १ ॥ भक्तीच्या शेवया मोकळ्या ज्ञानदुग्ध हें फार। घृत भक्तीची शर्करा वडा उपमा थोर ॥ २ ॥ तुर्या तुरीचें वरण सोऽहंबोधाचा भात। गोड पुरणपोळी उन्मनीं नित्य जेविती संत ॥ ३ ॥ जेणें तृप्त होसि तूं बरा जेथें सुख ना त्रास। **गोसावीनंदन** जेविला घेतो प्रेमाचा ग्रास ॥ ४ ॥

## पद ७१.

सूचना तुज किती रे करूं गा हरि वारंवार ॥ ध्रु० ॥ करुणाकर तो न दुजा पतितपावन ज्याचें नाम । अनन्य मतिनें गातां ध्यातां कृपा करिल तो राम ॥ १ ॥ जो जगदंतरिं तो तव अंतरिं पाहें करीं विचार । पापताप संहरितो नामें करितो जगदुद्धार ॥ २ ॥ **गोपालात्मज** सुखदा भक्ति प्रेमाचा ग्राहिक । मूढ मना हे किति शिकवूं तुज अजुन तरी आईक ॥ ३ ॥

## पद ७२.

श्रीगुरुचें चरणकंज हृदयीं स्मरावें ॥ ध्रु० ॥ निखिल निगम साधारण । सुलभाहुनि सुलभ बहू । इतर योगयाग विषम पथ कां धरावे ॥ १ ॥ नरतनु दृढ नाव इला । बुडवुनि अति मूढपणें । दुष्ट नष्ट कुक्कुरतनुमाजि कां फिरावें ॥ २ ॥ **रामतनय** विनवी तुज । अजुनि तरी समज उमज । विषयविष पिउनी व्यर्थ कां मरावें ॥३॥

## पद ७३.

तुजविण कोण दया करणार ॥ ध्रु० ॥ श्रीजगदीश हरे सुखसिंधो । म्हणतां अघ हरणार ॥ १ ॥ चिंताडोहीं बुडतां तेथें । येउनि कर धरणार ॥ २ ॥ त्यागुं नको मज निजयश राखीं । विश्वातें भरणार ॥३॥ **राजारामीं** लीन **प्रासादिक** । वचना अनुसरणार ॥ ४ ॥

## पद ७४.

देवा कोण मला तारी । धुंदी झाली दरबारीं ॥ ध्रु० ॥ पांडव तुज म्हणती खासा । दवडिसि त्यांतें वनवासा । छळि निशि येउनि दुर्वासा । परि तो पावे सुग्रासा । गोपी अनुसरल्या रासा । विरहें देसि तयां त्रासा । आवडे तुज कुब्जा नारी । धुंदी झाली दरबारीं ॥१॥

त्वन्मुखिं बाकि कुचविष घोंटी । मानिसि देवकिसम पोटीं । ज्याचीं आचरणें खोटीं । वदविसि तेथुनि शतकोटी । कीर्तनिं नारदरति मोठी । त्याला न मिळे लंगोटी । असि काय चाल तुझी भारी । धुंदी झाली दरबारीं ॥ २ ॥ त्वां जे भक्त विभो केले । ते विचित्र करिते झाले । कोणी पशुंतें बोलविलें । अमृत मृतांतें सेवविलें । कन्ये पुंस्त्वचि लेवविलें । मृत पितरांतें जेवविलें । मारुनि कां उठवा घारी । धुंदी झाली दरबारीं ॥ ३ ॥ अघटित घटनापटु देवा । नकळत लीलेची ठेवा । इच्छि मन निज धनहित ठेवा । यातें पदिं कां नच ठेवा । वद या **राजाराम** सेवा । पुरवीं **प्रासादिक** हेवा । घेउनि दाद भवा वारीं ॥ धुंदी झाली दरबारीं ॥ ४ ॥

## पद ७५.

ये धांवत कृष्णाबाई ग माझे आई ॥ ध्रु० ॥ कौरवपंक्तित चालें मी वाढित । कंचुकि फिटली करूं कायी ग ॥ १ ॥ एक म्हणे वाढिं भात । दुजा मागे पय घृत । किती ह्मणती पात्रीं पोळी नाहीं ग ॥ २ ॥ स्मरतां मनीं गरुडध्वज । द्रौपदी भासे चतुर्भुज । **माणिकप्रभुनें** बिरडें बांधिलें पाहीं ग ॥ ३ ॥

## पद ७६.

सगुणरूप नयनिं नयनि आधिं दावा । मग तुम्हि वेदांतचि गावा ॥ ध्रु० ॥ तुम्ही तरी म्हणतां । हरि हा हृदयस्थ । हें तंव जाणती समस्त । नव्हे आम्ही योगी । राहूं ध्यानस्थ । रिकामें वाढवुनी प्रस्थ । भक्तिविण ज्ञान । हा निर्फळ मानावा ॥ मग ०॥ १॥ दहींदुधाची । दुधाची करित चोरी । ठकविल्या गवळ्यांच्या पोरी । चटक लाविल्या । छळिल्या लहानथोरी । यशोदे बांधिलि ज्या दोरी ।

दामोदर तो । दर तो आणावा ॥ मग० ॥ २ ॥ यमुनातीरीं । तिरिं वाजवि वेणू । सर्वे गोपाळ चरि धेनू । ब्रह्मादिक जे वंदिति पदरेणू । दर्शन सुकृतफळ नेणूं । साहकाराचा । आनंद मानावा ॥ मग० ॥ ३ ॥ रासक्रीडेचें । क्रीडेचें सुख फार । हृदयिं आठवे वारंवार । सुंदर रूपडें । रूपडें सकुमार । मूर्ति लावण्य रतिसार । **माणिकप्रभु** तो । नेत्रीं वसवावा ॥ मग० ॥ ४ ॥

## पद ७७.

गडे हो कृष्ण गडी आपुला । यमुनाडोहीं बुडाला ॥ ध्रु० ॥ काळिया डसेल कृष्णाला । होइल विषबाधा हरिला । हाका मारिल आपुल्याला । तुम्हि तरि स्वस्थपणें बसलां । अतां कोण सोडविल रे त्याला ॥ यमुना० ॥ १ ॥ गाई त्याविण हंबरती । वांसरें स्तनपान न करिती । यापरि गोप सर्व रडती । मुखानें कृष्ण कृष्ण म्हणती । आतां काय भेटेल आपुल्याला ॥ यमुना० ॥ २ ॥ यशोदा पुसेल जरि हरिला । सांगों काय तरी तिजला । नंद ह्मणेल त्वां नेला । हलधर मारिल तो मजला । अतां काय जावें गोकुळाला ॥ यमुना० ॥ ३ ॥ दहिं दुध लोणी म्या हरिलें । हरिला ताक बळें दिधलें । घेइना म्हणोनि करिं धरिलें । वृक्षीं बळकट बांधियलें । ह्मणुनि तो मजवरती रुसला ॥ यमुना० ॥ ४ ॥ पेंदा धावुनियां आला । बळकट कृष्णाला डसला । त्याचे पाठीवर बसला । ओझें झालें बहु त्याला । म्हणुनि तो पळत पळत आला । भेटला **प्रेमाबाईला** ॥ गडे हो कृष्णगडी० ॥ ५ ॥

## पद ७८.

हरिहर गुरुराज भजा यमपुरिभय वारा ॥ ध्रु० ॥ प्रेमें हरिध्यान धरुनि नारायण बोला । संग त्यजुनि सगुण भजुनि रंग डंग डोला ॥ १ ॥ विषय दुःखरूप सकळ तुच्छ भोग त्यागा । सद्गुरुपदकमल नमुनि अचळदान मागा ॥ २ ॥ दारुण भय घोर पंथिं थोर दुःख झालें । कष्टुनि जड कर्म करुनि जन्मुनि बहु गेले ॥ १ ॥ कर्म सांग घडे ऐसें पुण्य गांठिं जोडा । **नारायण** परंधाम सद्गुरुपद जोडा ॥ ४ ॥

## पद ७९.

चाल चाल रे मना वना जाऊं । रम्य काननिं एकटे सुखी राहूं ॥ ध्रु० ॥ पुण्यारण्याची महाशोभा पाहूं । शोभा पाहतां श्रीहरिगुण गाऊं । वन्य तरुंचीं सुपर्णे फळें खाऊं । इच्छाविहारी त्या मृगांसंगें धावूं ॥ १ ॥ दिव्यसरितांचें जळ तृष्णाहारी । मलय मारुत हा स्वयें वारा वारी । पर्णशय्येतें मृदु निद्रा करीं । स्थिर राहें अंतरीं धीर धरीं ॥ २ ॥ रात्रिं लावूं सोज्वळ चंद्रदीप । विरक्ति कांतेचें पाहुं गौररूप । रूप पहातां आलिंगि आपोआप । दूर करीते स्वयें सर्व ताप ॥ ३ ॥ ऐशा सुखाची त्या वनीं आहे खाण । तेथें राहतां सांपडे त्याचि खूण । नेटें बोटें दाखवी **नारायण** । अंगें भेटवि तो सखा निरंजन ॥ ४ ॥

## पद ८०.

सोहं चांदणी । चांदणी ग साजणी । गुरुनीं दाखविली नयनीं ॥ ध्रु० ॥ हृदय सत्वाचे । सत्वाचे आकाशीं । उगवला उडुपति पुनवेशी ॥ शुद्ध कैवल्य । कैवल्यसिंधुवासी । देखिला सम तेजो-

राशी ॥ लोपल्या तारा । तारा ग तेजाशी । लगटल्या शीतळ किरणासी ॥ शुभ्र बिंबाचे । बिंबाचे अवकाशीं । गवसला पूर्ण योगियासी ॥ राजयोग्याची । योग्याचि योगरजनी ॥ गुरुनीं० ॥ १ ॥ गगनीं चंद्राचे । चंद्राचे अंगिं पुरती । पसरली दश द्वारावर्ती ॥ द्विदळ चक्राचे । चक्राचे दाळिं वसती । भ्रमरगुंफेंत राहे पुढती ॥ हंस पुरुषासी । पुरुषासि संग करिती । ब्रह्मरंध्रिंचे भुवन भरिती ॥ नादबिंदुच्या । बिंदुच्या कळा भवतीं । सकळ ब्रह्मांड भरुनि उरती ॥ पंच रंगाचे । रंगाचे शुद्ध अंगणीं ॥ गुरुनीं० ॥२॥ उठवर पाहतां । पाहतां परतोनी । सहज तनु गेली हरपोनी ॥ शेज शून्याची । शून्याची मनोहरिणी । सघन आनंदकंद परणी ॥ सुगम एकांत। एकांत वेद वर्णी । सगुण चंद्राशिं झालि मिळणी ॥ परम सुख झालें । झालें ब्रम्हभुवनीं । सखे बाई वदवेना वदनीं ॥ नवल सद्गुरुची । सद्गुरुची करणी । गुरुनीं० ॥ ३ ॥ प्रकट निजवस्तु । वस्तु चांदणी । फांकल्या प्रभा ग चिद्गगनीं ॥ शबळ मूळ माया । माया मोहिनी । सिद्ध योगींद्रचित्तरमणी । सकळ विश्रांति । विश्रांति भोग भवनीं । त्रिगुण जडजीव तापशमनी ॥ गहन संसार । संसारसिंधुतरणी । दत्तगुरु **नारायण**चरणीं ॥ जन्ममरणासी । मरणासि सोडि पाणी ॥ गुरुनीं० ॥ ४ ॥

## पद ८१. ( दादरा )

कृष्ण वासुदेव विष्णुमुररिपो । असत्कथा त्यजुनि वदन नाम हें जपो ॥ ध्रु० ॥ हरि तुझ्या रुपीं चित्त हें जडो । विषय इंद्रियभोग योग कांहिं नावडो ॥ १ ॥ स्मृतिविघातक काम हा बळी । स्थळस्थळीं तोष रोष उठवुनी छळी ॥ २ ॥ अगण्यापराध पतितही परी ।

स्मरुनि भिदा पाहि त्राहि कृपानिधे हरी ॥ ३ ॥ बुद्धिहीन शुद्ध भावही नसे । असुनि क्लिष्ट शिष्ट म्हणविं परि तुझा असें ॥ ४ ॥ कसा तरि तुझा ह्मणवितों खरा । करुनि भक्त सक्त चरणिं तारिं मावरा ॥ ५ ॥

## पद ८२.

अंत त्या सुखासि नसे म्हणुनि म्हणती संत रे । घडे यापरि जेव्हां स्वरूपीं सत्वाचा एकांत रे ॥ ध्रु० ॥ तदाकारवृत्तीसरिसे । स्वप्रकाशें आत्मा विलसे । त्याचि अंगें पहाणें पावे तेथेंचि विश्रांत रे ॥ १ ॥ विषयभान जेथें शून्य । चित्त चैतन्य अनन्य । स्फुरे प्रत्यय जैसा दीप मंदिरीं निवांत रे ॥ २ ॥ विधरे प्रसरित स्मृति । उर्वरित पूर्ण ज्ञप्ती । कैसें तें बोलावें जें कां स्फूर्तीचाही प्रांत रे ॥ ३॥ दासभाव जगन्निवास । विश्वात्मत्वें ध्यातां त्यास । दे कृपेनें प्रतिती ऐसी श्रीगुरु लक्ष्मीकांत रे ॥ ४ ॥

## पद ८२.

माझ्या रामाला आणा कोणि जा गे ॥ ध्रु० ॥ रूप सुंदर सकुमार बाई । खडे कंटक रुततील पायीं । कशि कैकयिला दया येत नाहीं ॥ माझ्या० ॥ १ ॥ कधीं न्हाणियलें नाहिं रघुनाथा । स्नेह नाहीं माखिलें त्याचे माथां । तें दुःख आठवलें वनासि जातां जातां ॥ माझ्या० ॥ २ ॥ राम जातो वना जीव झाला घाबरा । उभय नेत्रीं वाहती अश्रुधारा । रामावांचुनि नाहिं मला थारा थारा ॥ माझ्या० ॥ ३ ॥ कशी अंधाची हिरुनि नेलि काठी । कशी दुर्बळाची सुटुन पडलि गांठी । तसें कैकयिनें केलें मला कष्टी कष्टी ॥ माझ्या० ॥ ४ ॥ पूर्वीं पंक्तीसी केला असेल भेद । साधुसंतांसी केला असेल वाद । म्हणुनि कैकइनें केला मशीं रोध रोध ॥ माझ्या० ॥ ५ ॥ म्हणे

माधव शरण जावें कोणा । सद्गुरुवांचूनि नाहिं कोणि शाहणा । त्यानें भेटविला रघुराज राणा राणा ॥ माझ्या० ॥ ६ ॥

## पद ८४.

रामकृष्ण नरहरी विठोबा रामकृष्ण नरहरी । कधिं रे कधिं रे कधिं रे डोळां दाविशील पंढरी ॥ ध्रु० ॥ प्रपंच पसरे कसा विठोबा प्रपंच पसरे कसा । वनीं वाघुरें पसरि पारधी पिसे चिलकडे तसा ॥ म्हणती कोणि न बसा विठोबा म्हणती कोणि न बसा । कुटुंब परिवाराचे साठीं कुजनीं पसरी पसा ॥ वाहलों मी भवपुरीं विठोबा वाहलों मीं भवपुरीं ॥ कधिं रे० ॥ १ ॥ भवाब्धि बुडवी मला विठोबा भवाब्धि बुडवी मला । तुजवांचुनियां तारक न दिसे धांव लौकरी चला ॥ काळमगर पातला विठोबा काळमगर पातला । उडि घालुनि ओढितसे मजला बहुताचि दिसतो भला ॥ पडुनि राहिलों घरीं विठोबा पडुनि राहिलों घरीं ॥ कधिं रे० ॥ माधव आत्मा खरा विठोबा माधव आत्मा खरा । मी तों पतित पातकी आहें वरि वरि दिसतों बरा ॥ दिसे स्वहित तें करा विठोबा दिसे स्वहित तें करा । पतितपावन ब्रीदावळि हे संतत हृदयीं धरा ॥ वाहलों मी भवसरीं विठोबा वाहलों मी भवसरीं ॥ कधिं रे० ॥ ४ ॥

## पद ८५ पिलू—दीपचंदी.

निज वदनीं हरिनाम वसावें । न लगे त्यासि वनांत बसावें ॥ध्रु०॥
कोण मी कैंचा कोठुनि आलों । हें गुज श्रीगुरुलागिं पुसावें ॥ १ ॥
या पुनर्भवीं नाम निरूपम । ध्यान सगुण हृदयांत ठसावें ॥ २ ॥
जयरामात्मज प्रभुच्या कीर्तनिं । जाउनि प्रेमरसांत घुसावें ॥ ३ ॥

## पद ८६.

संतपदाची जोड । दे हरि ॥ ध्रु० ॥ संतसमागमें आत्मत्वाचा । सुंदर उगवे मोड ॥ १ ॥ सुफलित करुनी पूर्ण मनोरथ । पुरविशि जिविचें कोड ॥ २ ॥ **अमृत** म्हणे रे हरिभक्तांचा । शेवट करिसी गोड ॥ ३ ॥

## पद ८७.

भक्तांचा विश्राम रे । अंकिला श्रीराम रे । कैवल्याचें धाम भक्तां करी पूर्णकाम रे ॥ ध्रु० ॥ घेतां आळी बाळकें । त्यासी विश्वपाळकें । क्षीरसिंधु दिधला मुनिमानसमराळकें ॥ १ ॥ होतां ऋषिशाप रे । झाली शिळारूप रे । पादस्पर्शें जाहली ते अहल्या निष्पाप रे ॥ २ ॥ हाणोनियां चक्र रे । विदारिला नक्र रे । गजा गौरविलें तैसें न पवेचि शक्र रे ॥ ३ ॥ द्रौपदीची लाज रे । राखी महाराज रे । पांडवांचे घरीं करी सर्वस्वेंसी काज रे ॥ ४ ॥ रामीं रत चित्त रे । तेचि भक्त युक्त रे । **निजानंदीं** पूर्ण **रंगीं** रंगला अनंत रे ॥ ५ ॥

## पद ८८ ( त्रिवट ).

मन रामीं रंगलें । अरुणतरणि निभकिरण चरणतळ मम हृदया लागलें ॥ ध्रु० ॥ सगुण दिसे परि निर्गुण निष्कळ । निजानंदमय परब्रह्म तें । जिह्वरहित सुब्राम्हण जाणति । स्वसंवेद्य उगलें ॥ मन० ॥ १ ॥ सत्वलभ्य **अमृत**त्व तत्वगत । शांतिपरिमळीं श्रांति पावुनी । सकलावस्थातीत वीतभय । अनवरत जागलें ॥ मन० ॥ २ ॥

## पद ८९.

देव तो रे तो रे तो रे । पाहुनि मानस परतो रे ॥ ध्रु० ॥ पार्थाचे अश्वाचे हातीं धरोनियां दोरे । चंचल म्हणुनी त्यांतें म्हणतो

हो रे हो रे हो रे ॥ १ ॥ शिष्टाईस्तव घरासि येतां त्यासि न येती सामोरे । मरण पावले कौरवांचे पोरे पोरे पोरे ॥ २ ॥ चरण सेवितां श्रीलक्ष्मीचे हात झाले गोरे । तितें लेवत्री सोनियाचे दोरे दोरे दोरे ॥ ३ ॥ गुणगण लिहितां **अमृत कवीचे** केश झाले भोरे । बुद्धी न चले म्हणूनि कागद कोरे कोरे कोरे ॥ ४ ॥

## पद ९०.

उलट उलट माघारा प्राण्या फिर गोते खासी । भरला पुर मायेचा लोंढा वाहुनियां जाशी ॥ ध्रु० ॥ भवनदीचें पाणी सखया मोठें ओढितें । भल्या भल्या पोहणारां उचलुन खालीं पाडितें ॥ १ ॥ या अविद्येचा पूर वेगीं वसरेना । कल्पना सुसरी इची मिठी सुटेना ॥ २ ॥ क्षणभंगुर संसार याचा भरंवसा नाहीं । दुर्लभ नरतनु गेल्या मग तूं पडशिल पस्ताई ॥ ३ ॥ म्हणे **मुक्ताबाई चांग्या** अंतरिंची खूण । धरिं सद्गुरुचे पाय तुजला नेतिल उतरून ॥ ४ ॥

## पद ९१.

मुक्ताफळ नथ नाकीं । चरणीं ल्याली वाळे वांकी । पीतांबरें अंग झांकी । कृष्णम्मा माझी ॥ ध्रु० ॥ खांद्यावरी कांबळी । पायघोळ लांबली । पांघरली धाबळी । कृष्णम्मा माझी ॥ १ ॥ गाईपाठीं लागली । पळतां नाहीं भागली । माय बहीण चांगली । कृष्णम्मा माझी ॥ २ ॥ देहुडा पावली । उभी माझी माउली । विश्रांतीची साउली । कृष्णम्मा माझी ॥ ३ ॥ उभी नीट विटेवरी । शोभे भिवरेचे तीरीं । **नामयाची** कैवारी । कृष्णम्मा माझी ॥ ४ ॥

## पद ९२.

धांव रे धांव आतां । दीनवत्सला रामा । संसारसंगें दोषी । नित्य गुंतलों कामा ॥ध्रु०॥ तारुण्य अभिमान । देहीं भरला ताठा ॥ वैभव संपत्तीचा । अंगीं फुटला फांटा ॥ १ ॥ विषय सेवितां हे । वय वेंचलें माझें ॥ स्वहित आठवेना । ध्यान चुकलों तुझें ॥ २ ॥ विषय मोकलोनी । शरण तुज मी आलों । **एका जनार्दनीं** । दास तुझा मी झालों ॥ ३ ॥

## पद ९३.

अरे गाढवाच्या लेका । संसार गेला फुका ॥ ध्रु० ॥ संतांलागीं नमन करितां लाज वाटे चित्ता । संतचरण नावडती, आवडती बायलेच्या लाथा ॥ १ ॥ अंतकाळीं प्राण जातो, मरतो देतो तिडका । आमचीं पोरें भिउनि जातिल तोडा याचा झटका ॥ २ ॥ बारा सोळा पोरें झालीं आल्या सुना नातू । लक्ष्मी तरि निघोन गेली कमरेवरी हातू ॥ ३ ॥ कसें करूं काय करूं ऐशी करिसि चिंता । संतांलागीं विन्मुख होतां लाभ नये हाता ॥ ४ ॥ **एका जनार्दनीं** म्हणे संसार हा खोटा । संतांलागीं शरण जातां तुझा नाहीं तोटा ॥ ५ ॥

## पद ९४.

धन्य तोचि जगीं एक हरिरंगीं नाचे । रामकृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचे ॥ ध्रु० ॥ सुखदुःख समान सकळ जीवांचा कृपाळ । ज्ञानाचा उद्बोध भक्तिप्रेमाचा सुकाळ ॥ १ ॥ विषयीं विरक्त जया नाहीं आपपर । सर्वदा संतुष्ट विश्वव्यापक निर्धार ॥ २ ॥ जाणीव शहाणीव ओझें सांडुनियां दुरी । आपण वस्तीकर वर्ततसे संसारीं

॥ ३ ॥ **एका जनार्दनीं** नित्य हरीचें कीर्तन। आसनीं भोजनीं सदा हरीचें चिंतन ॥ ४ ॥

## पद ९५.

मन रामीं रंगलें अवघें मनचि राम झालें। सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें ॥ ध्रु० ॥ आत्मया रामाचें ध्यान लागलें मज कैसें। क्रियाकर्म धर्म अवघें तेणेंचि प्रकाशे। सत्यमिथ्या प्रकृतीपुरुष रामचि अवघा भासे ॥ १ ॥ चित्तचि हरपलें अवघें चैतन्य जाहलें। देखतां देखतां अवघें विश्व मावळलें। पाहतां पाहतेपणा हरिला सर्वस्वें ठकविलें ॥ २ ॥ भक्तिज्ञान वैराग्य लाभे आत्मस्थिती। निर्धारितां नकळे रामरूपीं जडली प्रीति। **एका जनार्दनीं** अवघा रामचि आदी अंतीं ॥ ३ ॥

## पद ९६.

झालि संध्या संदेह माझा गेला। आत्माराम हृदयशेजे आला ॥ ध्रु०॥ गुरुकृपा निर्मळ भागीरथी। शांति क्षमा यमुना सरस्वती। असिपदीं एकत्र जेथ होती। स्वानुभवस्नान हे गुप्तस्थिती ॥ १ ॥ सद्-बुद्धीचें घातलें शुद्धासन। वरी दया सद्गुरुची कृपा पूर्ण। शमदम अंगीं विभुती चर्चिली जाण। मुखीं उच्चारी केशव नारायण ॥ २ ॥ बोधपुत्र निर्माण झाला जेव्हां। ममता म्हातारी मरोन गेलि तेव्हां। भक्ति बहिण धांवोनि आलि गांवा। आतां संध्या करुं मी कैंचि केव्हां ॥ ३ ॥ सहज कर्में तीं झालिं कृष्णार्पण। ऐसें ऐकतां निवती साधु-जन। जन नव्हे अवघाचि जनार्दन। **एका जनार्दनीं** लाधली हेचि खूण ॥ ४ ॥

## पद ९७.

गुरुकृपांजन पायो मेरे भाई। रामबिना कछु जानत नाहीं ॥ध्रु०॥ अंदर राम बाहिर राम। जहां देखों वहां पूरन काम ॥ १ ॥ जागत राम सोवत राम। सपनेमें देखे राजाहि राम ॥ २ ॥ **एका जनार्दनीं** अनुभव नीका। जहां देखों वहा राम सरीखा ॥ ३ ॥

## पद ९८.

षड्गुणतरु आराम। सबांधव राम। कपींद्रा सुखी असे कीं राम ॥ ध्रु० ॥ कनककुरंगापाठीं गेले। प्रभु सर्वज्ञ काम ॥ १ ॥ निज कांतेतें दुष्टें हरिलें। स्मरतो मंगलधाम ॥ २ ॥ सौमित्रा दुर्वाक्यें छळिलें। त्याचा हा परिणाम ॥ ३ ॥ मजविरहित त्या निद्रा कैंची। अखिल लोकाभिराम ॥ ४ ॥ **त्र्यंबक भंगी** एका जनार्दनीं। करितो विबुधप्रणाम ॥ ५ ॥

## पद ९९.

भक्तांसाठीं तो जगजेठी बसोनि माळ्यावर। पांखरें उडवी सारंगधर॥ध्रु०॥ भक्तांमध्यें भक्ति पहा त्या बोधल्यानें केली। थोड्या ताटांना कणसें आलीं ॥ कैसा तो भगवंत विठ्ठल अनंतरूप व्याली। कशी देव भक्तांची माउली ॥ त्याचे चरणापाशीं विनंति जोडुनि दोन्ही कर ॥ पांखरें० ॥ १ ॥ नामदेवासी म्हणती ब्राह्मण जात तुझी ओंगळ। निघ बाहेर करिसि विटाळ ॥ गेला देउळामागें त्यानें केले दगडाचे टाळ। हरीनें फिरविलें देऊळ ॥ अगाध लीला त्याची द्वारका एका खांबावर ॥ पांखरें० ॥ २ ॥ जनाइच्या घरिं देवें भरिल्या पाण्याच्या घागरी। चहुं हातांनिं रांजण भरी। दळण कांडण धुणें धुवोनी पांटी डोईवरी। गवऱ्या वेचुन आणी घरीं ॥ प्रल्हादासि कसें तारिलें जळत अग्नीवर ॥ पांखरें० ॥ ३ ॥

चोख्यामेळ्याचे घरीं देवानें सोडिली द्वादशी । तेव्हां तें श्रुत झालें रायासी ॥ नेलें पाचारुन रायें तेव्हां शिक्षा दिधली त्यासी । देवा तूं मार त्याचा खासी । अगाध तूझी माव कळेना तुका जोडितो कर ॥ पांखरें० ॥ ४ ॥

## पद १००

येईं गा तूं येईं गा तूं पंढरीच्या राया ॥ तुजवीण शीण वाटे क्षीण झाली काया ॥ ध्रु० ॥ याती हीन मती हीन कर्म हीन माझें । सर्वहि लज्जा सोडुनि बापा शरण मी आलों तूज ॥ १ ॥ दीननाथ दीनबंधु नाम तुम्हा साजे । पतितपावन ऐशी ब्रीदावळी गाजे ॥२॥ विटेवरी उभा नीट कटीवरी कर । तुका म्हणे हेंचि आम्हा ध्यान निरंतर ॥ ३ ॥

## पद १०१

स्वस्थ बसावें । हरि ठेविल तैसें रहावें ॥ ध्रु० ॥ कोणे दिवशीं भोजनासि पक्कान्नें । कोणे दिवशीं खाया मिळति न अन्नें । कोणे दिवशीं नवरंगी पिकलीं पानें । बहु विडे खावे ॥ हरि० ॥ १ ॥ कोणे दिवशीं दारू हवया उडती । कोणे दिवशीं तास मशाला झडती । कोणे दिवशीं दिव्यांत ना बत्ती । गडप निजावें ॥ हरि० ॥ २ ॥ कोणे दिवशीं हौदा गज अंबारी । कोणे दिवशीं चळचळाट दरबारीं । कोणे दिवशीं पायिं निघाली स्वारी । तिडकत जावें ॥ हरि० ॥ ३ ॥ कोणे दिवशीं शाल दुशाला महालीं । कोणे दिवशीं शेज नवी पलंगीं । कोणे दिवशीं बाज मोडकी खालीं । स्वस्थ निजावें ॥ हरि० ॥ ४ ॥ कोणे दिवशीं माळ बुक्याची गर्दी । कोणे दिवशीं भजन प्रेमानंदीं । कोणे दिवशीं आपआपणा छंदीं । तुकयानें गावें ॥ हरि० ॥ ५ ॥

## पद १०२.

कृपाळू रघुवीरें । खादलीं भिलटी--बोरें । उच्छिष्ट आदरें । अंगिकारी रे ॥ ध्रु० ॥ वैभवीं नाहीं चाड । देवातें भावचि गोड । पुरवितो कोड । अनन्याचें रे ॥ १ ॥ दुर्लभ ब्रह्मादिकांशीं । सुलभ वानरांसी । काय तयांपाशीं । भावेंवीण रे ॥ २ ॥ रामीं **रामदास** म्हणे । देव हा दयाळूपणें । उठवितो रणें । वानरांचीं रे ॥ ३ ॥

## पद १०३.

जन्मलाचि नाहीं तो मरेल काई । जिणें मरणें दोन्ही नाहीं रे ॥ ध्रु० ॥ जनीं जीवन्मुक्त । वर्ततात हरिभक्त । सद्गुरुबोधें ते अच्युत रे ॥ १ ॥ जिणें आणि मरणें । येणें आणि जाणें । साधु तो अचळ पूर्णपणें रे ॥२॥ सेवितां साधूचे चरण।बाधीना दक्षिणायन।रामीं **रामदासीं** निजखूण रे ।

## पद १०३.

रघुवीर सुरवरदानी । भक्तांचा अभिमानी । योगी मुनिजन ध्यानीं । राहती समाधानी ॥ ध्रु० ॥ भूषणमंडित माळा । तेजाचा उमाळा । सुंदर सुमनमाळा । भोंवता मधुकरपाळा ॥ १ ॥ पीतवसन घन साजे । मुरडीव वाक वाजे । वर तोडर ब्रीद गाजे । कीर्ति विशाळचि माजे ॥ २ ॥ अभिनव कार्मुकपाणी । निगम गाति पुराणीं। विगलित होते वाणी । समजतसे शूलपाणी ॥ ३ ॥ राम सकळ जन पाळी । भक्तांला सांभाळी । जन्ममरणदुःख टाळी । अगणित सौख्य नव्हाळी ॥ ४ ॥ **दास म्हणे** मज हित । माझें कुळदैवत । जे जन होती रत । ते सकळहि तरत ॥ ५ ॥

## पद १०४.

रे मानवा उगीच आमचीं जिणीं । आम्हा ध्यानीं भेटीची शिराणी ॥ ध्रु० ॥ नरापरीस वानर भले । जिहीं डोळां रामा देखियेलें । ज्यांसि रघुराज हितगुज बोले । कोण्या भाग्यें भगवंत भेटले ॥ १ ॥ रामीं मिनले ते असो नीच याती । त्यांच्या चरणाची वंदीन माती । नित्य नव्हाळी गाउनी करूं किती । जेणें रघुनाथीं उपजेल प्रीति ॥ २ ॥ **रामी रामदास** म्हणे ऐका करूं । थोर आम्हीं तैसाचि भाव धरूं। भक्तिप्रेमाचा दावुं निर्धारु । तेणें आम्हा भेटेल रघुवीरू ॥ ३ ॥

## पद १०५.

भूतकाळीं कर्म केलें वर्तमानीं आलें । त्याचें सुख मानुनियां भोगितों आपुलें ॥ ध्रु० ॥ सुखदु:ख भोग जाला तोचि मागिल ठेवा। आतां दु:ख मानूं नको करीं रामसेवा ॥ १ ॥ बाइल मेली पोर मेलें द्रव्य नाहीं गांठी । तळमळ लागली जींवीं कां रे होसि कष्टी ॥ २॥ जें जें दु:ख होतें जींवा तेंचि मागिल कर्म । आतां त्याचें सुख मानीं स्मर रामनाम ॥ ३ ॥ नामाविण राहुं नको असा फजित होसी । पुन: घडी नये बापा नरकामध्यें जाशी ॥ ४ ॥ भविष्याचा धोका तुझे हातामध्यें आहे । पळभर विसरुं नको नाहिं कोणि साहे ॥ ५॥ सावध होईं सावध होईं किती सांगु तुजला । परिणाम कठिण मोठा शरण जाइं गुरुला ॥ ६ ॥ **दास** ह्मणे जालें तें तरि होउनियां गेलें। नको नको म्हणतांही भोगवितें केलें ॥ ७ ॥

## पद १०६.

होतें वैकुंठींच्या कोंणीं । शिरलें अयोध्याभुवनीं । लागे कौसल्येचे स्तनीं । तेंचि भूत गे ॥ ध्रु० ॥ जातां कौशिक राउळीं । अवलोकिली

भयंकर काळी । वनीं ताटिका निर्दाळी । तेंचि भूत गे ॥ १ ॥ मार्गीं जातां वनांतरीं । पाय पडला दगडावरी । पाषाणाची झाली नारी । तेंचि भूत गे ॥ २ ॥ जनकाचे अंगणिं गेलें । शंकराचें धनु भंगिलें । वैदेहीअंगीं संचरलें । तेंचि भूत गे ॥ ३ ॥ जेणें सहस्त्रार्जुन वधिला । तो तात्काळ भ्याला त्याला । धनुष्य देउनि देह रक्षिला । तेंचि भूत गे ॥ ४ ॥ पितयाचे भाकेसी । कैकयीच्या वचनासी। मानुनि गेलें अरण्यासी । तेंचि भूत गे ॥५॥ चौदा संवत्सर तापसी । अखंड हिंडे वनवासी । सांगातें भुजंग पोशी । तेंचि भूत गे ॥ ६ ॥ वाळीचें निर्दाळण । सुग्रिवाचें पाळण । तारी पाण्यावरि पाषाण। तेंचि भूत गे ॥ ७ ॥ वधिले रावण कुंभकर्ण । तोडी अमरांचें बंधन। राज्यीं स्थापिला बिभीषण । तेंचि भूत गे ॥ ८ ॥ वामांगीं स्त्रियेला धरिलें । शरयूतीरीं धावुनि आलें । तेथें भरतासी भेटलें । तेंचि भूत गे॥९॥ सर्व भूतांचें हृदय । त्याचें नांव रामराय । **रामदास** नित्य गाय । तेंचि भूत गे ॥ १० ॥

## पद १०७.

हे दयाळुवा हे दयाळुवा । हे दयाळुवा स्वामी राघवा ॥ ध्रु० ॥ प्रथमा कां मला लाविली सवै । मग उपेक्षितां योग्य हें नव्हे ॥ १ ॥ सकळ जाणतां अंतरस्थिती । मग तुम्हाप्रति काय विनंति ॥ २ ॥ दास तूमचा वाट पाहतो । बोलतां नये कंठ दाटतो ॥ ३ ॥ झड-करी यावें आजि राघवें । आळ घेतली माझिया जिवें ॥ ४ ॥ विषय खंगला रंग भंगला । मन उतावीळ तुझे भेटिला ॥ ५ ॥ भक्तव-त्सला हृदयकोमला । तुजाविणें कळा तेचि अवकळा ॥ ६ ॥ चर-णपंकजीं वृत्ति गुंतली । **रामदास** म्हणे माझी सांड कां केली ॥७॥

## पद १०८.

लटकि अविद्या माया रे । लटकी द्वैतभ्रांती रे । लटिका जीवशिवभाव स्वर्गनरकप्राप्ती रे ॥ १ ॥ संचित क्रियमाण रे । लटिकें झालें जाण रे । लटिकें प्रारब्ध मजला सद्गुरूची आण रे ॥ २ ॥ लटिके वर्णाश्रम रे । लटिकें क्रिया कर्म रे । अवघें लटिकें झालें **केशव** पाहतां परब्रह्म रे ॥ ३ ॥

## पद १०९.

फळला रे मज फळला रे । सर्वहि राघव कळला रे ॥ ध्रु० ॥ जगजीवन गतिनाशक हा । सम्यग्बोधप्रकाशक हा ॥ १ ॥ विचारसागर नागर हा । परम मनोहर शंकर हा ॥ २ ॥ केवळ मंगळदायक हा । तारक **केशव** नायक हा ॥ ३ ॥

## पद ११०.

माझे देहीं जितुकें कर्म होतें । त्यासीं कांहीं संबंध नाहिं मातें ॥ १ ॥ कर्मकर्ता करविता भगवंत । जो कां नांदे सर्वदा आम्हा आंत ॥ २ ॥ कर्मसूत्र चाळिता जनार्दन । आम्ही बाहुलीं नाचतों तयाधीन ॥ ३ ॥ कर्माकर्मीं आम्हासि शक्ति कैंची । म्हणे **केशव** अवघी सत्ता त्याची ॥ ४ ॥

## पद १११. (भूपाळी)

उठिं रे गोपाळा उघडीं स्वरूपलोचना । सरलि अविद्या राती उदय झाला रविकिरणा ॥ इंद्रिय गोधनें नेईं निर्गुण कानना । सुटलीं मानसवत्सें तुजविण नाकळती कोणा ॥ ध्रु० ॥ प्रबोध पहांट झाली सरलें तिमिर तमरज । गुरुकृपेचा अरुण दावी सुरंगसम तेज ॥ आत्मा दिनकर पाठीं प्रगटे तात्कालिक सहज । जिवचंद्राचें मंडळ

तेणें झालें निस्तेज ॥ १ ॥ दृश्याभास चांदणिया असते ठायिंच लोपलिया । लिंगदेह कमळींचे मधुकर सुटले आपसया ॥ बुद्धिबोध चक्रवाकें मिनलीं आपणिया । देहबुद्धि कुमुदिनी सुकोनी गेलीसे विलया ॥ २ ॥ योगविद्येच्या पंथें साधकवृंदें चालियलीं । उपनिषद्भागार्थ शब्द केला कोकिळीं ॥ वाग्वादाचे उलूक रिघती मौनाचे ढोलीं । विकल्प अटवी साहीं चोरीं सांडियली ॥ ३ ॥ विरागरश्मी जवळी धरितां चित्त रविकांत । आत्मा वन्ही प्रगटे विषयवन हें जाळित । तृष्णेच्या श्वापदावरी प्रळय अद्भुत । विश्व हें लटिकें मूढां मृगजळवत ॥ ४ ॥ जार व्यसनीं जिव हा झाला उदमीं सुविचार । वासना कुंटिणीचा सहजें खुंटला व्यापार ॥ **लीला विश्वंभर** स्वामी उठिला सत्वर । चाले **मुक्तेश्वर** संगें धरोनियां कर ॥ ५ ॥

## पद ११२.

धांव बा देवराया । किती अंत पाहसी । ब्रीद हें बांधुनियां दीननाथ म्हणविसी ॥ध्रु०॥ हीन दीन मतिमंद । माझी कीर्ति कां केली ॥ लाविसी नेत्र आतां । तरी ब्रीदावली गेली ॥ १ ॥ सर्वही जगामाजी । दास तुझा म्हणविलों । सोडिलें जरी मज त्वां । तरी वायां मी गेलों ॥ २ ॥ आधीं कां नाहीं माझा । अधिकार विचारिला । पल्लवीं वेडनियां । नुपेक्षीं जगपाला ॥ ३ ॥ दोष हे आचरावे । हेंचि आम्हा उचित । तवपदीं ब्रीद गर्जे । तारावे पतित ॥ ४ ॥ निशाण फडकतें । काष्ट त्याचें मोल काय । परी त्या अभिमानास्तव । रायाचें शिर जाय ॥ ५ ॥ दयाळू **देवनाथ** । कशासाठीं म्हणविसी । सोडिं सोडिं ब्रीदमाळा । आम्ही जाऊं निरयासी ॥ ६ ॥

## पद ११३.

राधावरराजपदासि आराधा । करिल क्षमापराधा ॥ ध्रु० ॥ कां रे सुतदारधनीं अटका रे । जोडुनी टका रे ॥ खारे पक्वान्न मृदु शाका रे । यम देत धका रे ॥ नामामृतअमृतसिद्धि साधा । करिल क्षमापराधा ॥ १ ॥ चहुंसांतिल सार प्रभु त्या गिंवसा । यदुवंशोत्तंसा ॥ हंसासनतातयशाचा धौंसा । वाजवा अहिंसा ॥ गवसुनि संसार करा नव्हेल बाधा । करिल क्षमापराधा ॥ २ ॥ निंदाद्वेषासि त्यजा या फंदा । धांवोनि मुकुंदा ॥ वंदा श्रीधरपदारविंदा । या सुखदानंदा ॥ नाचा गावोनियां तत्थाधा । करिल क्षमापराधा ॥ ३ ॥ थारे नेत्रांतरिं याच पथा रे । कां फिरा वृथा रे ॥ तारे नभगर्भी तया अवतारे । **देवनाथ** मता रे ॥ भजुनियां **दयाळ** नोबत धांधां ॥ करिल क्षमापराधा ॥ ४ ॥

## पद ११४.

रामा दयाघना कृपा करुनि मज पाहीं । जरि बहु अपराधी खराचि मी अन्यायी । तुजविण पाहतां रे संसारीं सुख नाहीं । निमिषभर कांहीं निमिषभर कांहीं ॥ रामा० ॥ ध्रु० ॥ कोठिल कोण मी न जाणिला हा पत्ता । आजवरि अज्ञानें मिरमिली विद्वत्ता । देहात्मत्वाची स्थिति झाली उन्मत्ता । येउनि जन्मा रे व्यर्थ श्रमविली आई हेंचि मनि खाई ॥ रामा० ॥ १ ॥ अनाथनाथ तूं मायबापही तैसा । परि मी उद्धवलों पतित पापी ऐसा । तरि निज नामाचें महत्त्व सांडिसि कैसा । पावननामा रे जाच देति रिपु साही साच वपु दाही ॥ रामा० ॥ २ ॥ करुणासागरा राघवा रघुराजा । विषयीं

पांगला नका करुं जिव माझा । भजनीं चांगला मिळवीं साधुसमाजा । भुलुनि प्रपंचा रे भ्रमुनि भ्रमुनि ठायिं ठायिं हरुनि वय जाई ॥ रामा० ॥ ३ ॥ सच्चित्सुख तो तूं परब्रम्ह केवळ । विश्वीं व्यापला तरंगीं जैसें जळ । अवतरतोसी हें उपासकाचें बळ । भक्तजनाला रे चित्रविचित्र उपायिं सतत सुखदायी ॥ रामा० ॥ ४ ॥ **विष्णु कृष्ण जगन्नाथ** तुझा मी लेक । चरणीं शरण दे स्मरण आपुलें एक । हातीं संतांची सेवा घडविं अनेक । जगदभिरामा रे मानस हें तव पायिं जडविं लवलाहीं ॥ रामा० ॥ ५ ॥

## पद ११५.

विश्वाचा विश्राम रे । स्वामी माझा राम रे । आनंदाचें धाम त्याचें गाऊं वाचे नाम रे ॥ ध्रु० ॥ चिद्रत्नाची खाण रे । एकाएकीं जाण रे । प्राणाचाही प्राण माझा गड्या तुझी आण रे ॥ १ ॥ देवाचा जो देव रे । तो हा स्वयमेव रे । अलक्ष्य लक्षुनी साक्षी घेऊं अंगें सेव रे ॥ २ ॥ शिवाचा आराम रे । भक्त पूर्णकाम रे । मुक्त योगी-जन गाती । जयासी निष्काम रे ॥ ३ ॥ मिथ्या हे अनेक रे । सत्य राम एक रे । **विष्णु कृष्ण जगन्नाथ** करि हा विवेक रे ॥ ४ ॥

## पद ११६.

पतितपावन दीनदयाघन करुणाकर देवा । श्रवण मनन निदिध्यासें निरंतर घडो तुझी सेवा ॥ ध्रु० ॥ परम प्रकाशक तेजोमय हें गुप्त तुझें स्वरूप । परतुनि दृष्टी पाहणें पाहतां निर्गुण हें अरूप । परमार्थे परिपूर्ण साधनीं भरलें हें अमूप । परात्पर तूं अंतरसाक्षी

हृदयभुवनदीप ॥ पतित० ॥ १ ॥ तिन्ही संधी साधुनि घेणें सुख हें एकांतीं । तिन्ही गुण हे निरसुनि शून्यीं उगवालि हे ज्योति । तीक्ष्णज्ञानें पुरतें पहातां कुळ नाहीं याती । तितुकी प्रतीति बाणलिया मग दिवस नाहिं राती ॥ प० ॥ २ ॥ तलगत तलगत सकळहि जिव हे चित्सिंधू आंत । तरंग जैसे उमटत भासत नासत हे बहुत । तरणोपाय सांगति साधू मत हे सिद्धांत । तरले येणें मार्गे बहुत देही देहातीत ॥ प० ॥ ३ ॥ पान्हा पिउनि प्रेमकळेचा हरिलें संकल्पा । पाहतां पार परेनें भवभय दोरीच्या सापा । पारंगत हे करुनि सकळही अहं सोहं कापा । पारख करितां तटस्थ जाहल्या नेत्रांच्या मलपा ॥ प० ॥ ४ ॥ वरिली शांति अंगीं जाहला पूर्ण अनुभव । वरदबळें सद्गुरुप्रसादें अक्षय वैभव । वमिलें सकळहि मायिक आतां नाहीं भयभव । वदली वाणी मौनपणीं हें रूप नाहिं नांव ॥ पतित० ॥ ५ ॥ नम्र होउनी वृत्ति लागली अलक्ष हें लग्न । नटत नटत हे लोक सकळही होउनियां मग्न । नख नलगे तेथ देहबुद्धिचें विकासलें गगन । नमुनि **सोहिरा** म्हणतो अवघा अलख निरंजन ॥ पतित० ॥ ६ ॥

## पद ११७.

तुजविण रे भगवान् । कोठेंचि मन हें न जडो ॥ ध्रु० ॥ मिथ्या ऐसें दिसोनि सकाळिक । विषयसुख नावडो ॥ प्रारब्धास्तव जे जे समयीं । घडेल तें सुखिं घडो ॥ तुज० ॥ १ ॥ योगलक्ष निज धैर्यबळें । जीव मोहांत न सांपडो ॥ आयुष्य सरल्या कधीं तरी ।

देह पडेल तेथें पडो ॥ तुज० ॥ २ ॥ वैराग्य ज्ञानें प्रचंड होउनि । अखंडित कडकडो ॥ प्रपंचरहाटीं वर्तत असतां । कोणिकडे न अडो ॥ तुजविण ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा विपरीत बुद्धी । कुसंग हा विघडो ॥ निमिष साधुनि शुद्ध ब्रम्हिचें । मोक्षद्वार उघडो ॥ तुजविण ॥ ४ ॥

## पद. ११८.

भगवंता तुझेंचि निरंतर स्मरण ध्यान लागो ॥ ध्रु० ॥ अनन्य भावें तुजला ध्यावें । रूपिं रिझावें तद्रूप व्हावें । सदैव कीर्तन नर्तन करुनी । परमानंदीं निमग्न होणें । हेंचि तुजप्रति मागों ॥ भगवंता० ॥ १ ॥ पोटासाठीं करितां सेवा । समूळ याचा वीटचि यावा । देहबुद्धिचा उबग द्यावा । भाषण दूषण नलगे हेवा । विषयसूख विषाचा मेवा । त्रिविध तापें अनुतापुनि । मन केवळाचि वितरागो ॥ भगवंता० ॥ २ ॥ म्हणे सोहिरा पंचभुतांची फिरते काया । यांत चालक त्रिगुण माया । छायावत् हा प्रपंच वाया । अजरामर तूंचि एक राया । तरणोपाया । प्रत्यक्ष ऐसा अनुभव जागो ॥ भगवं० ॥३॥

## पद ११९.

भगवानजी हा करिल तें सुखें करू । अनंत कोटी ब्रह्मांडनायक सदैव हाचि स्मरूं ॥ ध्रु० ॥ अंतरसाक्षी असोनी न दिसे । अनादि हा ईश्वरू ॥ स्थावरजंगम व्यापुनि उरला । अपार विश्वंभरू ॥ भगवानजी० ॥१॥ आचार धरुनि साचार भावें । विचारणा विवरूं ॥ दुरित निवारी हाची निश्चय । मनीं दृढ धरूं ॥ भग० ॥ २ ॥ कोठें

तरि वावरूं परि हें । शेवट आवरूं ॥ कर्मभोग आणि ज्ञानयोग हा ॥ समतुल्यचि सावरूं ॥ ३ ॥ ब्रह्मार्पण हें करुनि सकळही । अहंकृति परिहरूं ॥ अलक्ष भुवनीं लावुनि लय हें । आनंदें काळ हरूं ॥ भग० ॥ ४ ॥ प्रपंचरचना देखुनि कधींच । नयन न बावरू ॥ म्हणे सोहिरा कैवल्य जीवहा । जिताचि असतां मरूं ॥ भ० ॥ ५ ॥

## पद १२०.

अखंड भगवद्भजन करी तोचि येथें धन्य ॥ ध्रु० ॥ गगन व्यापक जैसें । जयाचें मनचि झालें तैसें । जयानें पाहिलें एकचि ऐसें । सर्व घटीं चैतन्य ॥ अखं० ॥ १ ॥ ज्याला वेद म्हणती नेती । तें काय मिळेल वाचल्या पोथी । येथ न चाले आपुली मति । ऐसें समजुनियां चित्तीं । उगेंचि घेतलें मौन्य ॥ अखंड० ॥ २ ॥ स्वप्नीं जें जें दिसे । तें तें जागृतीला नासे । तैसें जगद्रूप आभासे । बाणलें प्रतीतीस ऐसें । नित्यनिरंजन शून्य ॥ अखं० ॥ ३ ॥ म्हणे सोहिरा ब्रह्मरसायन प्याला । त्याला जन हें निंदो वंदो देहाला । आपण सोडुनियां मोहाला । झाला भगवंतासी मान्य ॥ अखंड० ॥ ४ ॥

## पद १२१.

भगवान् भवार्णव तारी । अनन्यगति शरणागतवत्सल भक्तजनां कैवारी ॥ ध्रु० ॥ पुण्यश्लोक जे धर्मपरायण जो संस्थापनकारी । दुष्ट दानव मारी तो हा युगायुगीं अवतारी ॥ १ ॥ काया माया नसेचि आया निर्गुण पाया ज्याचा ॥ सर्व खेळ हा त्याचा विश्व हें विचित्र चित्र चितारी ॥ २ ॥ परम प्रीति आभारीं संभूतसंभव हा संसारीं ।

ब्रह्मांड उभारी ब्रह्माहरिहर सुरनर उरगां भारी ॥ ३ ॥ म्हणे **सोहिरा** पतितपावन गुप्त गहन आकारी । सज्जनजनमनमोहन हा जगजीवन दीनोद्धारी ॥ ४ ॥

## पद १२२.

लय हें भगवन्तीं जरि लाय । मग हा प्रपंच केला तरि काय ॥ ध्रु० ॥ जैसी अभ्रींची हे छाया । कीं हे जाण नटाची जाया । अथवा मृगजळवत् हे माया । तैसी वाटत ज्याला काया । अवघेंचि मिथ्य दिसलें हाय ॥ मग हा० ॥ १ ॥ देहबुद्धि येतां भ्रांति । हृदयीं न धरे होते वांतीं । स्वस्थ बैसुनियां एकांतीं । कवण मी आहें आदी अंतीं । ऐसें अखंड पाहत जाय ॥ मग हा० ॥ २ ॥ जैसे जाण सतीचे भोग । तैसें वर वर दिसतें सोंग । अंतरिं जीवशिवाला योग । नासुनि गेलासे भवरोग । मोह हा मनचाचि मनिं खाय ॥ मग हा० ॥ ३ ॥ नयनीं नयेचि दृश्याभास । समूळ तुटला आशा-पाश । समग्र विकासलें आकाश । चंद्रसूर्याविण प्रकाश । चित्त हें महाशून्यीं स्थिर होय ॥ मग हा० ॥ ४ ॥ झाला प्रसन्न हा गुरु-राय । चुकवी जो भवरणघाय । त्याचे कधीं न सोडी पाय । त्याला तनुमन धन हें वाय । जो कां नित्य निरंजनिं धाय ॥ मग हा० ॥ ५ ॥ **सोहिरा** म्हणे सर्व समाय । विपरित गेले सर्व अपाय । हाता आला तरणोपाय । पिंड ब्रह्मांडीं न माय । जन्म मृत्यु जरा अपाय । त्याचा कळला तरणोपाय । अंगीं आहे पुरती कमाय ॥ मग हा० ॥ ६ ॥

## पद १२३.

तो भगवंताचा दास । ज्याचें मनची नित्य उदास ॥ ध्रु० ॥ टाकुनियां खेदास । न भुले मांस आणि मेदास। निरसुनियां भेदास। अक्षय पात्र ब्रह्मपदास ॥ तो भगवं० ॥ १ ॥ जेवीं भुजंग हा नादास । किंवा चकोर हा चांदास । चिंतनिं देव पावे सादास । अखंड भोगी सच्चिदानंदास ॥ तो भग० ॥ २ ॥ शास्त्रें नलगेचि शोधास । किंवा प्रवर्तेना वादास । जेवीं भ्रमर आमोदास । सेवी सुमनमकरंदास ॥ तो भग० ॥ ३ ॥ कोठें न पावेचि बंधास । जो कां देखे मूळकंदास । लागे भजनाच्या छंदास । नित्य आठवी गोविंदास ॥ तो भग० ॥ ४ ॥ न करी विषयांची आस । **सोहिरा** म्हणे हे बरदास । योग्य तो सद्गुरुच्या वरदास । ना चुके आपुलिया बिरुदास ॥ तो० ॥ ५ ॥

## पद १२४.

भगवन्त दाता । स्वामी तो आठविं आतां ॥ ध्रु० ॥ परमानंद प्रकाशवंत । ज्याला नाहीं आदी अंत । जो कां ध्याती अखंड संत । धरूनि जाती निर्गुण पंथ । अंतरिक्ष हें लावुनियां लय दक्ष होउनि मोक्षसुखाला सहज समाधीं राहतां ॥ स्वामी तो० ॥१॥ जेथुनि झाली सकळहि सृष्टि। याचा कर्ता न दिसे दृष्टि । म्हणवुनि होतें मन हें कष्टी । ऐकुनि अवघ्या ग्रंथी गोष्टी ॥ स्थावर जंगम नाना लीला विचित्र वर्णी शोभत धरणी तापत तरणी अगम्य करणी चरित्र हें पाहतां ॥ स्वामी० ॥ २ ॥ म्हणे **सोहिरा** अंगीं जडला। आधींच

आहे नाहीं घडला । प्राणी हा संदेहीं पडला । उपाधींत सांपडला । त्याचे दृष्टी ईश्वर दडला । ऐसा वेदांतीं निवडीला । तो हा व्यापक आत्मा अंतरसाक्ष परिपूर्ण सनातन गोड दिसे गातां ॥ भगवन्त० ॥ ३ ॥

## पद १२५.

भगवंताला स्मराल, तरि हा भवसागर तुम्हि तराल हो ॥ ध्रु० ॥ पापामध्यें न रहाल, शुद्ध हें पुण्यचि करा तराल । आणि योगी व्हाल तरी मोहफणीचें विष उतराल हो ॥ भग० ॥ १ ॥ आत्मा ना विसराल विषयतृष्णा ना पसराल । भ्रमांतुनि कसराल, आदिपुरुषाला अनुसराल हो ॥ भग० ॥ २ ॥ विचार हा विवराल, निरंतर भजनीं वावराल । निजशांतीला वराल, चंचळ मानस हें आवराल हो ॥ भग० ॥ ३ ॥ योगाभ्यासें झराल, अक्षय प्रेमातें पाझराल । निरंजनवनीं ठराल तेव्हां नित्यानंदें भराल हो ॥ भग० ॥ ४ ॥ **सोहिरा** म्हणे कर्म हराल, केंवी जन्मुनि पुढती मराल । चित्त चैतन्यीं सुधराल, तेव्हां उभय कुळें उद्धराल हो ॥ भग० ॥ ५ ॥

## पद १२६.

मजवरि तूं कृपा करीं । हरि देवराया रे ॥ ध्रु० ॥ प्रपंच जडला कधीं न सुटे । यावरि सहसा मन हें न विटे । मिथ्या पडली भ्रांति न तुटे । दुर्घट हा भवसिंधु तराया रे ॥ मजवरि० ॥ १ ॥ जीव हा गुंतला पोट भराया । चित्त हें नलगे भक्ति कराया ॥ स्वल्प दीन हे उरले मराया । आयुष्य गेलें आलें सराया रे ॥ मज० ॥ २ ॥

जैसा माशीस प्रियकर गूळ । तैसें लागे स्त्रियेचें खूळ ॥ अंगीं मदनाचा डुळडूळ । हेंचि कारण तुज विसराया रे ॥ मजवरि० ॥३॥ योगाभ्यासें त्रिकूट गडा या । पुरता मजला शिकविं चढाया । विक्षेप न करीं फिरुनि पडाया । उपाधींतूनि उतराया रे ॥ मज० ॥४॥ म्हणे **सोहिरा** मागें वरा या । हाचि निश्चय हृदयिं धराया ॥ परमप्रसाद देईं नरा या । सदैव तुजला स्मराया रे ॥ मज० ॥ ५ ॥

## पद १२७.

ऐसा जन्म नको हा मला । देवा शरण येतों मी तुला ॥ ध्रु० ॥ देह हें जाण जिवाला मोट । बांधुनि केलासे कडेलोट । तेथें श्रमतों भरतां पोट । दुःखें भोगिलीं कोटिनकोट ॥ ऐसा० ॥ १ ॥ जन्मांतरिंचें पुण्यपाप । प्राप्त जाहले त्रिविधताप । आयुष्याचें भरलें माप ॥ डोळां पडली मोहाची झांप ॥ ऐसा ॥ २ ॥ आपण पडला असतां बंदी । आणिक लोकांलाही निंदी । दुष्ट दुरात्मा हा द्वंद्वधी । करोनि होत समंधि ॥ ऐसा० ॥ ३ ॥ याला सुचेनाची सुटका । धरितो अभिमान हा लटका । अडला देहबुद्धिच्या अटका । ईश्वर स्मरेना एक घटका ॥ ऐसा ॥ ४ ॥ न रुचे संताची सोबत । पाठीं धांवेना लोंबत । नाहीं योगाला झोंबत । नायके अनाहत नौबत ॥ ऐसा० ॥ ५ ॥ **सोहिरा** ह्मणे यांतुनि सोडीं । आवरीं मानसाच्या ओढी । दहाही इंद्रियांतें कोंडीं । लावीं आत्मस्वरूपीं गोडी ॥ ऐसा० ॥६॥

## पद १२८.

त्या देवाचें तूं दर्शन घे । संसारमोहांतुनि त्वरित निघें ॥ ध्रु० ॥ आदि अंत ना मध्य जयाला । नेती नेती म्हणती वेद तयाला ।

ज्यापासुनि हा ॐकारहि जाहला । ब्रम्हा विष्णु हर हे तिघे ॥ त्या दे० ॥ १ ॥ अगम्य अगोचर सत्ता ज्याची । सहज लीला हे त्याची । जारज स्वेदज अंडज उद्भिज । ज्यापासुनि हें सहज निघे ॥ त्या दे० ॥ २ ॥ दृश्य सकळहि निवडुनि पाहतां । निरालंबीं राहतां । प्राणापान ऊर्ध्वहि वाहतां । आनंदभुवनीं मन हें रिघे ॥ त्या देवाचें० ॥३॥ ह्मणे **सोहिरा** शून्याकार । रूप नाहीं आकार । परब्रम्हचि निर्विकार । अंतरीं बाहेर अवघें ॥ त्या देवाचें० ॥ ४ ॥

## पद १२९.

विसरुं नको तो देव । जो हरि साक्षिभूत स्वयमेव ॥ ध्रु० ॥ तारुण्यकाळीं पुण्यदशेचा होउं पाहतो चेव । रंगरूपाला भुळूं नको तूं, पाहत स्त्रियांचे टेव ॥ विसरुं० ॥ १ ॥ अंतकाल हा पावे तोंवरि, भवसागर हा पेव । वैराग्यविवेकें सांगाविरहित सदैव सुख हें सेव ॥ विसरुं० ॥ २ ॥ पराधीनता पावेल तेंव्हां, विस्मय पडेल भेव । स्वइच्छ असणें,वास्तव घरघर भिक्षा मागुनि जेव ॥ विसरुं०॥ ३॥ म्हणे **सोहिरा** त्यावांचुनि हें शरीर केवळ शव । स्वयंप्रकाशक सत्ता ज्याची चालवि हे अवयव ॥ विसरुं० ॥ ४ ॥

## पद १३०.

हरिभजनावीण काळ घालवूं नको रे ॥ ध्रु० ॥ संतसंगतिनें उमज । चिद्रूपासि पुरतें समज ॥ अनुभवावीण मान हालवूं नको रे ॥ हरि० ॥ १ ॥ दोरिच्या सापा भिउनि भवा । भेटि नाहीं

जिवा शिवा ॥ अंतरिंचा ज्ञानदिवा मालवूं नको रे ॥ हरि० ॥ २ ॥ विवेकाचि ठरेल ओल । ऐसे बोलावे कीं बोल । आपल्या मतें उगीच चिखल कालवूं नको रे ॥ हरि० ॥ ३ ॥ **सोहिरा** म्हणे ज्ञानज्योति । तेथें कैंचि दिवस राति । तयाविणें नेत्रपाति हालवूं नको रे ॥ हरि० ॥ ४ ॥

## पद १३१.

हरिस्मरण विस्मरण तरि तुझें काय जिणें रे असून ॥ ध्रु० ॥ स्वार्थचि साधिसि, सार्थक नेणसि कोणासि पहा तरि पुसून । पुढें नाहिं गति मलीन झाली मति साधुचि संगति नसून ॥ हरि० ॥ १ ॥ रतीविलासीं लंपट होसी मानस गेलें डसून । लवकर सरकीं पडसिल नरकीं फुकट मरशिल कुसून ॥ हरि० ॥ २ ॥ आळसि कामा उगा रिकामा थट्टाचि करिसी बसून । कुकर्माच्या कांहिं वर्माच्या गोष्टि सांगसी कसून ॥ हरिस्म० ॥ ३ ॥ शरीर फिरवीं तुजला मिरवी देव असे रे रुसून । जवळि असून तुझे हृदयीं वसून भगवन्त नये रे दिसून ॥ हरिस्म० ॥ ४ ॥ म्हणे **सोहिरा** गैबनाथ हा । माझे हृदयीं घुसून । जनासि उद्धरावया कारणें वचन सांगतो ठसून ॥ हरिस्म० ॥ ५ ॥

## पद १३२.

तो काय प्राणी विसरला हरिला जन्मापासून ॥ ध्रु० ॥ करितां संसार धंदा आठविना गोविंदा । नित्य करी द्वेषनिंदा सांपडला भवबंधा । चिंतेनें चूर केला ग्रासून ॥ तो काय० ॥ १ ॥ भुलला जो शब्द-

नादीं संतोषला शास्त्रवादीं ॥ कीर्तीसाठीं विद्या साधी त्याला अभिमान बाधी । नानाछंदीं बुद्धि गेली नासून ॥ तो काय ० ॥ २ ॥ देहाला मी ऐसें मानी, निरंतर आपणा वानी । पडला संशयाचे रानीं, विचार हा नेघे कानीं । डुल्लतसे मोहमदिरा प्राशून ॥ तो काय० ॥ ३ ॥ अवकाश जाहल्या वेळे भलताचि खेळ खेळे । जो गर्वमदें सदा घोळे, अन्यथा सुखांत लोळे । सांगू जातां बोले डोळे त्रासून ॥ तो काय० ॥ ४ ॥ कटकें खरें करी बासून, संसारीं जो घेतो घांसून । नक्कल करी मारी हांसून, त्रिविध तापें घेतो लासून । दु:खशोकें दांत वासून ॥ तो काय० ॥ ५ ॥ **सोहिरा** म्हणे व्यर्थ जन्म, निष्फळ त्याचें क्रिया कर्म । पांघुरला शरीरचर्म, जो कां नेणें मुक्तिचें वर्म । कोण्या कामाचा हा काय असून ॥ तो काय ॥ ६ ॥

## पद १३३.

देशिल जरि तरि हें देणें ॥ ध्रु० ॥ मीपण: मावळे दिठि पुंजाळे कल्पना गळे जग जळे हें तेणें ॥ देशिल० ॥१॥ विषयावेगळें सुख नाहीं रूपरेख सहज समाधान होय जेणें ॥ दे० ॥२॥ जळीं मिळालें लवण जळचि झालें तेवीं मनासि नाहीं येणें ॥ देशिल० ॥ ३ ॥ **सोहिरा** म्हणजे जया काया नाहीं माया पवन गगनीं लयासि न्हेणें ॥ दे० ॥४॥

## पद १३४.

आतां तरि सोडीं रे हा संग । जनिं वनिं हो नि:संग ॥ ध्रु० ॥ विषयसंयोगें धरिसी सोंग । दु:खोंचि होसी दंग । अभ्रसाउली जेंवि

बाहुली । बेगडिचा हा रंग ॥ आतां० ॥१॥ परनारीसी करूनि परती । आवरिं हा कीं अनंग । ब्रम्हरसाचे भावाविण रज–तमें होय जीव वंग ॥ आतां० ॥ २ ॥ योगाभ्यासें करूनि साधीं । बैठक पवन तुरंग । धांवे जेथ कीं तेथ धरावा । हा मन चपळ कुरंग ॥ आतां० ॥ ३ ॥ नसोनि दिसतें केवळ जग हें मृगजाळिंचे कीं तरंग । चिद्भानू हा कारण आत्मा । पहा तूं कीं अंतरंग ॥ आतां० ॥ ४ ॥ म्हणे **सोहिरा** निर्गुण ध्यानीं नये तरि । स्मर सांवळी मूर्ति सुरंग । वैकुंठपति हा व्यापक विष्णु । अवघाचि कीं श्रीरंग ॥ आतां०॥४॥

## पद १३५.

सद्गुरुसी हटका । आतां करा आपुलि सुटका । दृश्यभास नाश पावे । स्थिर नोहे घटका ॥ ध्रु० ॥ लिंगदेह यमदूतां सांपडेल अटका । आत्मज्ञानें उमजुनियां आधिंच तुम्हीं सटका ॥ सद्गुरुसी० ॥१॥ करितो लीळा टिळे माळा प्राणी नीट नेटका । केंव्हां नेणों पाठिवरी काळ मारिल मुटका ॥ सद्गुरु ०॥ २ ॥ भजनावांचुनि वेळ कधीं घालवुं नका लटका । मनीं राम मुखीं नाम करीं मार चुटका ॥ सद्गुरु० ॥ ३ ॥ म्हणे **सोहिरा** राहुं नका घट जसा फुटका । निरंजनीं पूर्ण बोध प्रेम पिवा घुटका ॥ सद्गुरु ० ॥ ४ ॥

## पद १३६.

अशाचि खालीं गेला प्राण्या जन्म तुझा व्यर्थ । कवण मी हा कोठिल तुजला नकळे परमार्थ ॥ ध्रु० ॥ अरूप आत्मा ब्रह्मस्वरूपीं

नलगे लक्षांश । अनेक शास्त्राभ्यासें तुजला प्रियकर वाच्यांश । जितुकी विद्या तितुका वृत्तिचा आढळतसे अंश । परतुनि दृष्टि न पाहे नाथसंकेतीं चिदंश ॥ अशाचि० ॥१॥ ऋद्धि सिद्धि गारूड पहातां लाभ काय तुजला । प्रमाण मानुनि देह केवळ भुलसी धातूला । अंतरीं ज्ञानप्रवेश न होय नाशचि हा तुला । अमूक ऐसा न कळे तुजला चालक आंतुला ॥ अशाचि० ॥ २ ॥ गगनवनाचे ठायीं न होय मन हें विश्राम । संकट वाटे मोठें सोडितां इंद्रियग्राम । तीर्थ व्रतें दान धर्म हीं तितुकीं सकाम । निरालंब हें निर्गुण येणें न मिळे निजधाम ॥ अशाचि० ॥ ३ ॥ म्हणे **सोहिरा** कणासि टाकुनि उपणीसी कोंडा । आत्मज्ञानीं अनावडी जाशि अवरुची तोंडा । मायानदिचा हा तुजवरती आलासे लोंढा । वाहत वाहत जासिल तेथें प्राप्त नव्हे धोंडा ॥ अशाचि० ॥ ४ ॥

## पद १३७.

प्राण्या तुझा परिणामीं कठिण प्रकार ॥ ध्रु० ॥ न करिसी भजन, न करिसी पूजन । नाहीं तुला आत्मज्ञानाचाही अधिकार ॥ प्राण्या० ॥ १ ॥ तुला संत भेटेल कोठचा, जरि लाभ झाला भेटिचा । शिकविल्या बोला देसी वेठिचा हुंकार ॥१॥ प्राण्या० ॥ तुला याद नाहीं आदली, कल्पना हे तुज बाधली । नाहीं योगारण्यीं साधली मनमृगाची शिकार ॥ प्राण्या० ॥ ३ ॥ म्हणसी आपणामाजी थोर, परी तूं देवापाशीं चोर । अवघा पदरीं बांधुनि घोर करिसी लटकी लकार

प्राण्या० ॥ ४ ॥ ज्यांचें तुजपाशीं काज, तुजला म्हणती ते महाराज ॥ होय होय जी जी करुनी करिती जयजयकार ॥ प्राण्या० ॥ ५ ॥ अध:पाता धाडिल शेखीं पेंचा पाडिल । दोहींकडे नाडिल, स्थूलबुद्धिचा अहंकार प्राण्या० ॥६॥ **सोहिरा** म्हणे झांकळसी जन्ममरण आकळसी । जोंवरि अंतरदृष्टि नोळखसी ब्रह्म निराकार ॥ प्राण्या०॥७॥

## पद १३८.

तूं कसा रे तरसिल प्राणिया ॥ या हरिभजनावांचुनी ॥ ध्रु० ॥ तुझें चंचळ हें बहु चित्त । घडी नससी सावचित्त । असे चिंता हे ढंवचित । नसे आत्मसुखाची प्रचीत । डसे मृत्यु हा अवचित । जीवित काय करिसी सांचुनि ॥ तूं कसा० ॥१॥ केवळ बुद्धीचा तूं हीण । होसी शब्दज्ञानें प्रवीण । उपदेशउदकीं तूं पाषाण । सुख नेणसी विषयावीण । वैराग्य न धरिसि एक क्षण । काय करिसी ग्रंथ वाचुनी ॥ तूं कसा० ॥२॥ सदैव तुझिये वदनीं निंदा । आन नसेचि दुसरा धंदा । रे तूं अजाण दुर्मति मंदा । केवळ विषयमदमदांधा । रे तूं स्वभावें बेबंदा ॥ साधुसंतांला जाचुनी ॥ तूं कसा० ॥३॥ **सोहिरा** म्हणे तूं मूढ रे । परमार्थ तुला हा गूढ रे । बाहेर लौकिक करिसी रूढ रे । ये पुढें यम घेईल सूड रे । तुझ्या जिण्या लागो चूड रे । अंतिं इंद्रियां लासुनी ॥ तूं कसा० ॥ ४ ॥

## पद १३९.

मातर्जनकराजतनये । त्रिजगज्जननि सदयहृदये ॥ विनंती करुनि चित्त वळवा । प्रभुला केव माझि कळवा ध्रु० ॥ मारुतिराया बलभीमा । द्या मज हरिभजनीं प्रेमा ॥ अजि लक्ष्मणजी जगजेठी । करा मज रामचरणभेटी ॥ विनंती० ॥१॥ भरतजी एवढि करा सवडी ।

द्या मज रामपदीं आवडी ॥ शत्रुघ्नजी करा करुणा । दाखवा रामरायचरणा ॥ विनंती० ॥ २ ॥ सुग्रीवजी मीड खर्चा । करा मज दास प्रभु घरचा ॥ लंकानाथ विभीषणजी ॥ द्या प्रभुपाशिं दाद माझी ॥ विनं० ॥ ३ ॥ अहो अंगदप्रमुख भक्त । घ्या मज आत्ममंडळांत ॥ **विठ्ठलपंत** उभा द्वारीं । भिकारी दीन हाका मारी ॥ विनं० ॥ ४ ॥

## पद १४०.

श्रीरंगा, दे मजला सत्संगा आलों शरण तुला ॥ १ ॥ रघुनाथा, आवडो तव गुणगाथा ॥ आलों० ॥ २ ॥ गोविंदा, सोडविं विषयछंदा ॥ आलों० ॥ ३ ॥ स्वानंदा, विसरविं मायिक धंदा ॥ आलों० ॥ ४ ॥ श्रीकृष्णा, दूर करीं धनतृष्णा ॥ आलों० ॥ ५ ॥ रघुराया, आवरीं आपुली माया ॥ आलों० ॥ ६ ॥ गोपाळा, उघडीं चिन्मय डोळा ॥ आलों० ॥ ७ ॥ श्रीरामा, दे मज भजनप्रेमा ॥ आलों० ॥ ८ ॥ घनश्यामा, नेईं मज निजधामा ॥ आलों० ॥ ९ ॥ भगवंता तारीं **विठ्ठलपंता** ॥ आलों० ॥ १० ॥

## पद १४१.

रामकृष्ण नरहरे स्वामिन् रामकृष्ण नरहरे ॥ कधीं करिशिल बा दया दयाळा गर्भवास हा पुरे ॥ ध्रु० ॥ काय करूं मी बरें सांगा काय० ॥ कळों येति मज माझे दोषगुण चित्त परी नावरे ॥ १ ॥ विषयीं मन नावरे सदोदित विषयीं० ॥ काम क्रोध हे चोर लुटिति मज प्राण होति घाबरे ॥ २ ॥ धांव धांव धांव रे सत्वर धांव धांव० ॥ बुडतो भवसागरीं दीन हा उद्धरिं आपुल्या करें ॥ ३ ॥ विचार मज न स्फुरे कांहीं विचार० ॥ केविं गति होईल म्हणुनियां जिव हा

अंतरिं झुरे ॥ ४ ॥ प्रार्थितसें आदरें, आतां एक प्रार्थि० ॥ असें करीं तव नाम निरंतर **पंत विठ्ठल** स्मरे ॥ ५ ॥

## पद १४२.

उत्तम जन्मा येउनि रामा गेलों उगा वायां ॥ दुष्ट पातकी शरण मी आलों सत्वर तव पायां ॥ ध्रु० ॥ आधीं चुकलों मुकलों मी निज वेदस्वाध्याया ॥ कर्में श्रौतस्मार्त न घडलीं सद्गति साधाया ॥ पुराण परिसुनि सादर झालों यशहि न तव गाया ॥ स्वस्थपणें कधिं नाहिं फावलें तुजला पूजाया ॥ १ ॥ आर्जविलें बहु लवणभंजनें व्याह्या जावाया ॥ क्षुधित अतिथि कधिं नाहिं घेतला प्रेमें जेवाया ॥ उदार कर कधिं केला नाहीं पैसा एक द्याया ॥ नाम फुकटचें तेंहि न आलें स्वामी वदना या ॥ उत्तम० ॥ २ ॥ कपट करुनियां निपट भोंदिल्या बहुत आया बाया ॥ केली धन गृह क्षेत्र स्त्री पशु शिशुवर बहु माया ॥ नित्य सजविली वसनभूषणें निंद्य ही काया ॥ सिद्ध ठेविली सदाहि रसना सज्जन निंदाया ॥ उत्तम० ॥ ३ ॥ वट-वट निशिदिनिं केलि चहुकडे मन हें रमवाया ॥ केलें स्नान न संध्या जप तप दुष्कृत शमवाया ॥ क्षणहि न केला साधुसमागम भवदव निववाया ॥ सद्यःकामुक झालों पाहुनि परधन परजाया ॥ उत्तम० ॥ ४ ॥ नाहीं विद्या कलाकुशलता तुजला रिझवाया ॥ शुद्ध मधुर वाणीही नाहीं तुजला विनवाया ॥ बुद्धिहि नाहीं न कळे काहीं शर-णागत व्हाया ॥ थकलि मजल सर्वथा दयाळा स्वहित आचराया ॥ उत्तम० ॥ ५ ॥ हरि कनवाळू करि दीनावरि करुणेची छाया ॥ निगम नगारा गर्जे ऐसा निखिला कळवाया ॥ यावरि विश्वासुनियां

आलों जवळ तुझ्या पायां ॥ शुद्ध दगड हा **पंत विठ्ठल** स्वामी रघुराया ॥ उत्तम० ॥ ६ ॥

## पद १४३.

राघवा तुझा तुझा लागो छंद ॥ न जडो दुर्मतिचा गंध ॥ ध्रु० ॥
न रुचो विषय विषय विषावाणी ॥ आवडो संतांची वाणी ॥ स०१॥
अंगीं रोमांच रोमांच नयनपाणी ॥ झिरपो तुझीं गातां गाणीं॥रा०॥२॥
**विठ्ठलपंतासी** पंतासि हेंचि काम ॥ आवडो सदा तुझें नाम॥रा०॥३॥

## पद १४४.

रामकथामृतधार । सेवा राम० ॥ ध्रु० ॥ दृष्टिदोषहर तुष्टिवृष्टिकर ॥ ज्ञानपुष्टि केदार ॥ सेवा रामक० ॥ १ ॥ फार फार संसारविहारज ॥ दाह सुधाकासार ॥ सेवा राम० ॥ २ ॥ वित्तवासना–पित्त चित्तगत । कृत्त करुनि करि गार ॥ सेवा० ॥ ३ ॥ हंत संतमत **पंत विठ्ठल** ॥ स्वांत शांतिभांडार ॥ सेवा राम० ॥ ४ ॥

## पद १४५.

नामशर्करा गोड हरिची नाम०॥ सोडवि दुर्मति खोड॥हरि०॥ध्रु०॥
दुष्टघृष्ट परि दुष्ट अहंकृति–महिष होतसे रोड ॥ हरिची० ॥ १ ॥
हरवुनि संशय सकळ मनाचे उपजवि सन्मतिमोड ॥ हरि० ॥ २ ॥
सुलभ सेवितां सहज होतसे ब्रह्मपदाची जोड ॥ हरि० ॥ ३ ॥
**पंत विठ्ठल** प्रेक्षित ही भक्ति भवतरणावरि तोड ॥ हरि० ॥ ४ ॥

## पद १४६.

करिं अति त्वरा ॥ घडि घडि घडि पलपल जप । अमृतधाम रामनाम, धरुनि आदरा ॥ करिं० ॥ ध्रु० ॥ अंतसमय परमघोर,

दोषत्रय करिति जोर, घुरु घुरु घुरु कंठ होय, भरिल भ्रम हरिल स्मृति, करिल घाबरा ॥ करिं० ॥ १ ॥ अति दुर्धर अपरिहरा येइल जंव तुजसि जरा, लट लट लट हलल मान, धनुसमान तनु पुमान, होत बावरा ॥ करिं० ॥ २ ॥ जो इंद्रियसंघदक्ष तो निजकल्याणदक्ष, त्यज वटवट खटपट उगि झटपट करिं कपटरहित, भज रमावरा ॥ करिं अतित्वरा ॥ ३ ॥ विनवि **पंत विठ्ठल** शरम किमपि धरीं विरम विरम विषयिं न रम अमरमहित चरम तनू परम लाभ न करिं मातिरा ॥ ४ ॥

## पद १४७.

हरि हा आनंदाचा कंद ॥ आनंदाचा कंद उभा पुढें भक्तसखा गोविंद ॥ हरि हा आनंदाचा कंद ॥ ध्रु० ॥ सजलनीरदश्यामतनू नवरत्नखचित–सौवर्णमुगुट शिरपेंच तुरा वरि कलगि विराजित कुटिलालक निटिलासि कस्तुरीतिलक केशरीगंध ॥ हरि० ॥ १ ॥ श्रवणिं मनोहर मकरकुंडलें फुल्लगल्ल कर्णांतदीर्घ-सुप्रसन्न-लोचन इंदुवदन तिलपुष्प-नासिका कुंदरदन हनु, अधर बिंबगत हास्य मंदमंद ॥ हरि०२॥ कंबुकंठ कौस्तुभाभरण शुभपटीरपंकनवद्रवरूषित पीवरांस केयूरविभूषित कनककटक सहरत्नतोडर प्रभानुभाषित शंखसुदर्शन गदासरोरुह लसच्चतुर्भज ललितांगुलि धृतरत्नमुद्रिकावृंद ॥ हरि० ॥ ३ ॥ विशाल वक्षस्थळीं रमाकुच-कुंभकुंकुमालेपलिप्त श्रीत्वसलांछित सुवर्ण यज्ञोपवीत मध्यवलित्रय वंधुर निम्ननाभि तनु रोमराजि लुटदुत्तरीयपट पारिजात नवकुसुम तुलसि-कामिश्रहार पादाग्रचुंबि नभ भरुनि जयाचा मधुर सूटला गंध ॥

हरि० ॥ ४ ॥ कटी तटीं जरिकांठि पीत कौशेयवास पटवास सुवासित विचित्र शृंखल अगणित मणि झाणे झणित मंजुलक्वणित किंकिणी विपुलतरोरु द्वंद्वविराजित जानुजंघ सुकुमार सरलतर कनकवलययुत रत्नतोडरें मंजुमंजु सिंजानहरिमंजीर परिष्कृत सहजरक्त मृदु वज्र अंकुशध्वजांबुजांकित वृत्त वृत्त उत्तुंग रक्तनखचक्रवालसत्पुण्य चंद्रिका ध्वस्त महध्द्दयांधतमस मंदाकिनीमाहेरचरण—दुगधृत रणरणिक जयाच्या क्षणिक ध्यानें तुटती झटिति सर्व भवबंध ॥ हरि० ॥ ५ ॥ कोटिकोटि कंदर्परूप लावण्यदर्पहर ध्यान मनोहर अनंतजन्म मनोमलपटलीनिर्मूलनकर भक्तिगम्यतापत्रयभंजन आसेचनक ध्यानिं पहातां वाटे जणुं नयनांत भरावें हुंगावें दृढ आलिंगावें कीं चुंबावें विसरतसे संसार सर्वही संतत याचा **पंत विठ्ठला** सहज लागला छंद ॥ हरि० ॥ ६ ॥

## पद १४८.

हातीं पांवा मोहरी काठी । माथां दधीबोणें वाटी ॥ चालतां गाईंचे पाठीं । घालिती डोहो ॥ १ ॥ सखा गोपाळ ज्यांचा । महिमा अपार त्यांचा ॥ आनंदें खेळे जयांचा । गोपाळगडी ॥ २ ॥ मांडीया थापटिती । भोई फक फोडिती ॥ हमामा तो घालिती । होती माघारे बळी ॥ ३ ॥ लाखी रंगी घोंगडी । संवगडे गोपाळगडी ॥ देखोनि यमुनेची थडी । आनंद बहु ॥ ४ ॥ पूर्ण तृप्त झाल्या गाई । बैसल्या कळंबाछांई ॥ शिदोऱ्या आणा रे भाई । सांवळा म्हणे ॥ ५ ॥ सम खडकावरी । घोंगडी पसरोनि बरी ॥ मध्यें बैसले हरि ॥ भोंवते सखे ॥ ६ ॥ दहीं भात शिदोरी । लोणचीं अंगोळ्या करीं ॥ चाखोनि

म्हणती हरि । गोड तें घेई ॥ ७ ॥ अवघे म्हणती सांवळ्यास । आधीं घेई आमुचा ग्रास ॥ कान्होबा तुझाही ग्रास । घालीं तूं आम्हां ॥ ८ ॥ स्वानंदें खेळती । वांकुल्या दाविती ॥ स्वर्गींचे देव टाकिती । उच्छिष्ट ज्यांचें ॥ ९ ॥ गुराखी ह्मणाल जरी । देव न पावती सरी ॥ ब्रह्मा वंदितो शिरीं । चरणधुळी ॥ १० ॥ **जयराम कृष्णदास** । सेवुनि तयांचें शेष ॥ निवाला सावकाश । स्वानंदें खेळे ॥ ११ ॥

## पद १४९.

अर्जुना तूं जाण रे ॥ होशिल सुजाण रे ॥ विश्व नाहीं मीच आहें सख्या तुझी आण रे ॥ ध्रु० ॥ माती माजी घट रे ॥ तंतूमाजी पट रे ॥ माती तंतू विचारितां कैंचा घटपट रे ॥ १ ॥ रज्जु सर्पाकार रे ॥ सर्प ना तो दोरे रे ॥ दोरामाजी सर्प भासे वांझेचें तें पोर रे ॥ २ ॥ हेमीं अलंकार रे ॥ पाण्याची ते गार रे ॥ हेम पाणी विचारितां कैंचा तो आकार रे ॥ ३ ॥ तैसें जग हें पाहीं रे ॥ जों रामीं दृष्टी नाहीं रे ॥ रामीं राम झाल्या मग जग कैंचें काय रे ॥ ४ ॥ अंडें कोटी खर्व रे । मजमाजी सर्व रे ॥ न मीं त्यांत न तीं मजमध्यें हें अपूर्व रे ॥ ५ ॥ राजविद्या गूज रे ॥ सांगतसें तूज रे ॥ कलिमाजी **वामना**सी हेंचि देणें मज रे ॥ ६ ॥

## पद १५०.

ध्यातां सुतकामिनी ॥ जातां दिन यामिनी ॥ घडीभरी तरी मनीं ॥ आठवा राम ॥ १ ॥ धंदा न सुटे जरी ॥ सुखें असा व्यापारीं ॥ वाचे आणि अंतरीं ॥ आठवा राम ॥ २ ॥ करितां संसारकाम ॥ वाचे असों द्यावा राम ॥ शिवाचें विश्रामधाम ॥ आठवा

राम ॥ ३ ॥ दिवस गेला व्यापारीं ॥ निद्रेखालीं रात्री सारी ॥ गेले दिवस दोनी चारी ॥ । आठवा राम ॥ ४ ॥ काळ जातो घडी घडी ॥ मोडितो देहाची वडी ॥ गोष्टी हे तों ऊघडी ॥ आठवा राम ॥ ५ ॥ कायावाचा मनेंकरून ॥ प्रार्थितसे **वामन** ॥ अहो भावें हें वचन ॥ आठवा राम ॥ ६ ॥

## पद १५१.

सांगड बांधा रे भक्तीची रघुनाथनामाची ॥ ध्रु० ॥ संसार सागर सागर ॥ भरला जातो पूर ॥ १ ॥ प्रपंच भोंवरा भोंवरा ॥ फिरतसे गरगरा ॥ २ ॥ लाटा उसळती विषयाच्या ॥ बहुत प्रपंचाच्या ॥ ३ ॥ **नरहरि बोधला** बोधिला ॥ हरिनामीं रंगला ॥ ४ ॥

## पद १५२.

तारीं तारीं गुरुराया । गेला गेला जन्म वायां ॥ ध्रु० ॥ केलें नाहीं शिवध्यान । केला साधूचा अपमान ॥ धरिला मान नरकीं जाया ॥ तारीं तारीं० ॥ १ ॥ केलें नाहीं गंगास्नान । नाहीं गोदेचें दर्शन ॥ किंवा समुद्रा उधळण । यमुना कालिंदीस जाया ॥ २ ॥ काय केलें पापाचरण । असे कोठें गेलें मरण । जालों सर्व परि दीन । दिलीं कन्यासुत यमराया ॥ ३ ॥ घडलें नाहीं देवदर्शन । नाहीं फिरलों तीर्थाटण । संसारीं गुंतलें मन । **काशी** दीन लागे पाया ॥ ४ ॥

## पद १५३.

देवा ! नलगे तुमचें कांहीं हो । चंचळ हें मन निश्चळ होउनि विनटो तुमचे पायीं हो ॥ ध्रु० ॥ नलगे सुत-धन-गृह-दारा मज इंद्र-

पदादि कदाही हो । तव पदपंकजभजनेंविण मज सर्वहि ते आपदाही हो ॥ १ ॥ देशी वर जरि तरि तूं आतां याचि स्वरूपें राहीं हो ॥ यावच्चंद्रदिवाकर येथुनि कोठेंही नवजाई हो ॥ २ ॥ दर्शनमात्रें जडमुढ पापी निजपदवी त्यां देई हो । **शिवतनय** तव दीन तयाचे हृदयमंदिरा येई हो ॥ ३ ॥

## पद १५४.

वाचे शिव शिव नाम गा रे । शिवधर्मीं जागा रे ॥ ध्रु० ॥ दुर्लभ या नरदेहीं येउनि काय उगा निसुगा रे । आळस करितां नकळे केव्हां देइल काळ दगा रे ॥१॥ हरिहरनामावांचुनि आणिक साधीं न लगा रे । नामचि हें भवतारक म्हणवुनि वाजति वेदनगारे ॥२॥ यौवन जन धनसंपतिचा तूं धरिसी व्यर्थ फुगा रे । संपति तों अवघे विषयी जन मिळती जेंवि लुगारे ॥ ३ ॥ सद्गुरुकरुणापांगें विश्वीं विश्वंभर उमगा रे । **शिवतनय** प्रभुचे गुण गाउनि अक्षय सुख भोगा रे ॥ ४ ॥

## पद १५५.

ते मज निरवधि आवडती भक्त महासुकृति ॥ कायावाचामानस अर्पुनि जे मजला भजती ॥ ध्रु० ॥ ज्यांच्या पादरजें गा अद्भुत ब्रह्मांडें विरजें । व्हावीं, यास्तव त्यांमागें मी चालें पादगती ॥ १ ॥ दोंवरि दोन्ही भुजा घेउनी आलों या काजा ॥ कीं कवळावें अंग तयांचें हृदयीं चौंहातीं ॥ २ ॥ श्रीसद्गुरुच्या बोलें विश्वीं मजला ओळखिलें ॥ नित्य **अनंत** अनामय त्या मज स्वमनीं सांठविती ॥३॥

## पद १५६.

मनुजवरा विषयकाम वाढवूं नको ॥ ध्रु० ॥ क्षणिकाचि संसार सुखी सार म्हणुनि गुंतलासि । भजन तंतु करुनि मना तोडवूं नको ॥ १ ॥ कामलोभ मोहबद्ध जाहलासि काय तरी । भाव भक्ति धर्म कर्म बुडवूं नको ॥ २ ॥ सद्गुरुसी शरण रिघुनि जनन मरण दूर करीं । **निरंजनीं** लाग भेद रूढवूं नको ॥ ३ ॥

## पद १५७

दाखविं तव दिव्य पाय दयानिधे रामा ॥ ध्रु० ॥ हीन दीन आस तुझी कास पूर्ण आम्हां ॥ धरावया पाहतसें अगा घनश्यामा ॥ दाखविं० ॥१॥ माय बाप बंधु गोत्र, मित्र, तूंचि आम्हां ॥ तुजवीण कोण असे सांग सख्या रामा ॥ दाख० ॥२॥ सखया, **आनंदतनय** म्हणे गुणग्रामा ॥ शीणभाग हरीं त्वरें पुसोनियां घामा॥ दाख० ॥३॥

## पद १५८.

कां रे ! नाठविशी कमलनयन वासुदेव ? ॥ ध्रु० ॥ जपति जया संतसनक । सकळ जना जननि जनक ॥ कां रे० ॥ १ ॥ कलुषहरण विमलचरित । करुनि निजानंदभरित ॥ कां रे० ॥ २ ॥ विचरे **आनंदतनय** । हृदयिं धरुनि नंदतनय ॥ कां रे० ॥ ३ ॥

## पद १५९.

रत हरिपदकमलकंद सेविं मनोभ्रमरा ॥ ध्रु० ॥ दुष्ट दैत्य दमुनि देत निज भक्तां थारा । द्रुततर मनिं धरुनि भाव सांडिं भवपसारा ॥ रत० ॥ १ ॥ शुकसनकादिक मुनी जपंति ज्या आधारा । सुरवर मुनि गाति मुखें नित्य निराकारा ॥ रत० ॥ २ ॥ पावनपदरजेंक-

शनि गौतममुनि दारा । निशिदिनीं आनंदतनय गाय वेदसारा ॥ रत० ॥ ३ ॥

## पद १६०.

पाउलापाउलीं निज मनीं आळवा सांवळा हो । बाळा त्या गोपाळा हृदयीं कवळा वेळोंवेळां हो ॥ ध्रु० ॥ दारा धन मति सारा मग तुम्हि वारा या संसारा हो । नारायण सुखसारावांचुनि थारा न करीं यारा हो ॥ १ ॥ भंगा कलिमलसंगा हृदयीं आलिंगा श्रीरंगा हो। रंगा मनिं भवसंगा टाकुनि अंगा काळविहंगा हो ॥ २ ॥ तुंदा या मतिमंदा त्यजुनी निंदा कुश्चल धंदा हो । वंदा या **आनंदात्मज** सुखकंदा नंदानंदा हो ॥ ३ ॥

## पद १६१.

देव करील दया । तयावरि देव करील दया ॥ध्रु०॥ स्वपर म्हणुनि मति न धरिं चराचरिं । निर्मळ भाव जया ॥ तया०॥१ ॥ रक्षक तो सकळां कमळापति । जाणुनि न धरि भया ॥ तया० ॥२॥ **आनंदतनय** म्हणे हरिचे कीर्तनीं । काशि प्रयाग गया ॥ तया० ॥ ३ ॥

## पद १६२.

जो नर नटका । हरि वदनीं नयेचि घटका ॥ ध्रु० ॥ निमा जामा फिरकी पगडी माजी शोभे पटका । मखमालि पैजार पायिं चालतां मोठा वाजे चटका ॥ १ ॥ उष्ण वरान्नें सघृत शर्करा भोजनिं गोधुमकुटका । अतिथि आलिया विन्मुख होउनि आपणचि करितो गटका ॥२॥ मृदुशय्येवरि तरुणी पत्नीसन्निध बाव्या चिटका । लौकिकास्तव कथेसि जाउनि प्रेमें डोले लटका ॥ ३ ॥ जिव्हाशि-

नपरायण त्यावरि कळिकाळाचा फटका । हंसत हंसत **आनंदतनय** म्हणे कैसी होईल सुटका ॥ ४ ॥

## पद १६३.

कैसेंही कीर्तन करितां कल्याण बरवें आहे ॥ ध्रु० ॥ वाल्मिकि उफराट्या नामानें । पावन झाला वक्ता मानें । पतित पुत्राच्या अभिधानें । तरला संसार लवलाहें ॥ कैसेंही० ॥ १ ॥ शुका पढवितां पापिणी । केला परमात्मा तो ऋणी । चढली वैकुंठा कुंटिणी । केवढें कौतुक हें पाहे ॥ कैसें० ॥ २ ॥ शुद्ध बुद्धी नसतां ज्ञान । विताळ ईश्वर करितां गान । तारक नामाचें महिमान । **आनंदात्मज** गुण लाहे ॥ कैसें० ॥ ३ ॥

## पद १६४.

रामा कृष्णा गोविंदा गोपाळा । वेळोवेळां वाचेसी लागो चाळा॥ध्रु०॥ कोटी धेनु सत्पात्रें दिधल्या दाना । ग्राम कोटी आराम रचिले नाना । या भेदानीं तो धर्म दिसे साना । नामस्मरणमहिमा सत्य जाणा ॥१॥ गंगास्नानें तेव्हांची कोटि केलीं । दानधर्मादिक पुण्यें तेथें ठेलीं । योगयागादिक कर्में सिद्धि नेलीं। ऐशीं नामें वाचेसी जेव्हां आलीं॥२॥ याचि मंत्रें नारदादि गाती गाणीं । ज्याचा महिमा तो जाणे शूळपाणी । नामापाशीं कैवल्य मुक्तिखाणी । बोले भावें **आनंदतनय** वाणी ॥३॥

## पद १६५.

अद्वयानंद शौरी । गोविंद गोपचारी ॥ ध्रु० ॥ श्रीरंग रंगमूर्ती । घननीळ नीळकांती । मुखचंद्र चंद्रज्योती । सुंदरेशाळ शांती । आपाद वैजयंती । कुंडलें वोप देती । मस्तकीं कुरळपंक्ती । श्रुतिभृंग

रंजताती ॥ १ ॥ कटितटीं कसियेला । अतिपीत पट्ट पिंवळा । भुजदंड शुंड जैसा । रेखिल्या चित्रशाळा । श्रुति वल्लभूषणाच्या । बांधिल्या श्रीदमाळा । नूपुरें तोडरेंसीं । गर्जती चरणकमळा ॥ २ ॥ गुंफिला मयूरपिच्छें । जो शिरीं टोप घाली । केशरी कस्तुरीचा । रेखिला टिळक भाळीं । आकर्ण नयन खोदी । कर्णिका कर्णसाळी । सांवळी मूर्ति शोभे । सुगंध उटी पिंवळी ॥ ३ ॥ बांधिली वीरगुंठी । मणिगुंजहार कंठीं । वीषाण काक्षिपुटीं । वरि शंखचक्र काठी । वाजवी मंजुळ वेणु । देऊन बिंब ओष्टीं । **आनंदतनय** प्रभुसी । जरि पाय लागो सृष्टी ॥ ४ ॥

## पद १६६.

ते नर तारियले श्रीमुकुंदें । जे चरणा शरण रिघाले ॥ ध्रु० ॥ मकरें निजरदनिकरें करिपद निकरें धरितां छंदें । 'हरि रे !' म्हणतां हरिनें भय परिहरिलें जगदानंदें ॥ ते नर०॥१॥ कुरुकुमरें सती कुरळीं धरितां कुरूप चढे मतिमंदें । बाहे तंव प्रभु लाहे तव पद लाहे परमानंदें ॥ ते नर० ॥ २ ॥ ध्रुव वनिं रिघतां ध्रुवपद दिधलें जोडुनि करारविंदें । **आनंदनंदन** या संसारीं तारियलें गोविंदें ॥ ते नर० ॥ ३ ॥

## पद १६७.

धन्य झाली ते वनीं भिल्लभाजा । जिनें केला संतुष्ट रामराजा॥१॥ फळें देतां चाखोनि गोडगोड । रामचंद्रें सेविलीं कोडकोड ॥ २ ॥ आजि पुरली तहान डोळियांची । मूर्ति पाहतां श्रीरामराघवाची ॥३ ॥ भावभक्तीचा लाभ मशीं झाला । गीत गातां **आनंदतनय** धाला॥४॥

## पद १६८.

नमो नृसिंहा तुझ्या चरणकमला । हाचि गमला मला लाभ विमला ॥ ध्रु० ॥ जेथ निरुपाधिकानंद लक्षोनि चपलासमा राहिली स्वस्थ कमला । ब्रह्मभावासि वर्णाक्षरें वर्णितां निगमत्रय शेष फणिसहित दमला ॥ १ ॥ त्रिविध तापानळें परम संतप्त हा जीव विश्रांतिभंगें विरमला । म्हणुनि दीनावना शरण आलों तुला तत्क्षणीं भगवत्पूर्वे रमला ॥ २ ॥ करुनि करुणा जगद्वंद्य करुणानिधे दे स्वसुख चिद्घना विहित शमला । मग सहज विठ्ठलभ्रांतिचा वात संताप संजात निभ्रांत शमला ॥ ३ ॥

## लावणी १६९.

येउं दे वाचे नाम देवाचें अष्टौ प्रहरा शिव हर हर ॥ ध्रु० ॥ दे टाकुनि हे छंद वाउगे फंद विषयाची काय मजा ॥ हरिनामाची लावि ध्वजा ॥ असार हा संसार त्यजा ॥ तमोगुणाला द्याच रजा ॥ सत्वगुणाची करीं पूजा । क्षमा शांति मनिं धरीत जा ॥ भगवीं वस्त्रें करीं पोटभर भिक्षा मागें घर घर घर ॥ १ ॥ परोपकारा शरीर झिजावें जैसा मैलागिरि चंदन ॥ कर सज्जनचरणीं वंदन । सा शत्रूंचें करिं कंदन ॥ गृहवैभव वाजी स्यंदन । अशाश्वतीं ह्या हो धुंद न ॥ आठविं मनिं दशरथनंदन । अनंतफंदी घालि विठला गरके गर गर गर॥२॥

## भूपाळी १७०.

घनश्याम सुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ॥ उठिं लवकरि वनमाळी उदयाचळीं मित्र आला ॥ ध्रु० ॥ सायंकाळीं एके मेळीं द्विजगण अवघे वृक्षीं । अरुणोदय होतांचि उडाले चरावया पक्षी ॥ अघमर्षणादि करुनि तापसी तपाचरण दक्षी । प्रभातकाळीं उठुनि

कापडी तीर्थपंथ लक्षी ॥ करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षी। यमुनाजळासी जाति मुकुंदा, दध्योदन भक्षीं ॥ मुक्तता होऊं पाहे कमळिणीपासुनियां भ्रमरा। पूर्वदिशे मुख धुतलें, होतसे नाश तिमिरा ॥ उठि लवकरि गोविंदा सांवळ्या नंदकुमरा। मुखप्रक्षालन करीं अंगिकारीं भाकरकाला ॥ उठीं ॥ १ ॥ घरोघरीं दीप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती। गीत गाति सप्रेमें गोपी सदना येति जाती॥ प्रवर्तोनि गृहकामीं रंगावळी घालुं पाहती। आनंदकंदा प्रभात झाली उठ सरली राती ॥ काढीं धार क्षीरपात्र घेउनी धेनू हंबरती। दारिं उभे गोपाळ तुजला हांका मारुनि बाहती ॥ हे सुमनहार कंठिं घालि या गुंजमाळा। हातीं वेत्रकाष्ठ बरवें कांबळा घेइं काळा ॥ ममात्मजा मधुसूदना ऋषीकेशी जगत्पाला। हंबरताति वासुरें धेनु स्तन-पान्हा आला ॥ २ ॥ प्रातःस्नानें करुनि, गोपिका अलंकार नटती। कुंकुमादि चर्चुनी मंथनालागीं आरंभिती ॥ प्रेम-भरित अंतरांत वदनीं नामावळि गाती ॥ अर्घ्यदान देउनियां द्विज-जन देवार्चन करिती ॥ नेमनिष्ठ वैष्णव ते विष्णुपूजा समर्पिती। स्मार्त शिवार्चन सक्त शक्तिते शाक्त आराधिती ॥ ऋषिगण आश्रम-वासी जे कां निरंजनीं धाले। अरुणोदय होतांचि आपुले ध्यानिं मग्न झाले ॥ पंच पंच उषःकालीं रविचक्र निघों आलें। येवढा वेळ निजलासि म्हणुनि हरि समजेल नंदाला ॥ ३ ॥ विद्यार्थी विद्याभ्या-सास्तव सादर गुरुपायीं। अध्यापन गुरु करिति शिष्यही अध्ययना उदयीं ॥ याज्ञिक जन कुंडांत आहुती टाकिताति पाहीं। रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही। हे माझे सांवळे पाडसे उठिं कृष्णाबाई। सिद्ध सवें बळिराम घेउनि गोधनें वना जाई ॥ मुनि-

जनमानसहंसा गोपीमनःकमलभृंगा । मुरहरपंकजपाणी पद्मनाभ श्रीरंगा । शकटांतक सर्वेशा हे हरि प्रतापतुंगा । कोटिरवींहुनि तेज आगळें तुझिया वदनाला ॥ होनाजिबाळा नित्य ध्यातसे हृदयिं नाममाळा ॥ उठिं० ॥ ४ ॥

## पद १७१.

माझें मागणें मागणें नसे कांहीं । निरंतर मम हृदयीं राहीं ॥ध्रु०॥ गुंतलों मायीं मायीं भवपाशीं। जित्र दुःखित बहु परदेशी ॥ कोण गत करूं करूं गा हृषीकेशी । कठोरता नको धरूं मजशीं ॥ अंतरीं दया दया येउं द्यावी ॥ निरंतर० ॥१॥ भरवंसा तुझिया तुझिया नामाचा ॥ अशी गर्जेली वेदवाचा ॥ शीण दूर केला केला संतांचा । पाढेवार झाला पंताचा ॥ श्रीदावळि साजे साजे ऐसि पाहीं ॥ निरंतर०॥२॥ कृपासागरा सागरा श्रीअनंता । कशी तोडिली माझि ममता । काय हें झालें झालें ममसंचिता । सांग श्रीहरी रमाकांता ॥ येईं बा त्वरें त्वरें शेषशायी ॥ निरंतर० ॥३॥ नगनाथ म्हणे म्हणे बा गोपिरमणा । शरण मी आलों जगजीवना ॥ भक्तवत्सला वत्सला दीनोद्धरणा । मुरहरसुत विनवी चरणा ॥ पदीं आपुल्या आपुल्या ठाव देईं ॥ निरं-तर० ॥ ४ ॥

## पद ( दिंडी ) १७२.

सांडुनियां वासना विषयाची । टाकुनियां संगती मीपणाची॥ध्रु०॥ सर्व भावें चिंतिति मज पाहीं । नेणती ते मजवीण अन्य कांहीं॥१॥ माझ्या ठायीं सर्वदा विनटले । देशकाळासी विसरोनि गेले ॥ २ ॥ देउनियां निजबोध पूर्ण त्यांसी । रक्षितों मी अर्जुना अहर्निशी ॥ ३॥ जीवन्मुक्तपदींच दृढ ठेवीं । पडों नेदीं तयांसि भवगोवी ॥ ४ ॥

## पद १७३.

जयजय बलभीमा हो बलभीमा । अद्भुत तव बलगरिमा ॥ ध्रु० ॥
जयजय मारुतिराया । निजजन सुखदायक प्रभुवर्या ॥ जयजय ॥ १ ॥
रामदूत सुखसारा । पिंगलनयना परम उदारा ॥ जयजय ॥ २ ॥
रजनीचरसंहारा । तारा भवभय सर्व निवारा ॥ जयजय ॥ ३ ॥
सीताशोकविनाशा । मत्प्रिय प्राणा वानरवेषा ॥ जयजय ॥ ४ ॥
दुर्धर या भवजीवनीं । तारूं तूंचि मज द्रुमपाणी ॥ जयजय ॥ ५ ॥
आणुनियां गिरिद्रोणा । दिधलें लक्ष्मणा जिवदाना ॥ जयजय ॥ ६ ॥
षड्रिपुंवरि करिं मारा । अंजनितनया अति सुकुमारा ॥ जयजय ॥७॥
मम हृदयीं बैसोनी । दावीं ब्रम्हरूप जग नयनीं ॥ जयजय ॥ ८ ॥
बुडतां या भवकर्दमीं । काढीं ठेवीं तव पदपद्मीं ॥ जयजय ॥ ९ ॥
रुद्ररूपीया ताता । अनाथनाथा श्रीहनुमंता ॥ जयजय ॥ १० ॥
**देवनाथ** प्रभु दाता । न लवीं लवपलक्षण ये आतां ॥ जयजय ॥ ११ ॥

## पद. १७४.

तारक श्रीराम रामनाम वदा वाणी ॥ ध्रु० ॥ गरळदाह विकळ करित, लावि सकळ शीतलास । शीतल नव्हे म्हणुनि जपत, नाम शूळपाणी ॥ तारक० ॥ १ ॥ नारदोपदेश पाप हरुनि तारि वाल्मिकास । उफराटें जपत नाम अक्षरें दोन्ही ॥ तारक० ॥ २ ॥ स्वसुतमिषें अजामीळ गणिका शुक पढवितांचि । अद्भुत प्रताप दावि तारियली पापिणी ॥ तारक० ॥ ३ ॥ सद्गुरु गोविंदनाथ, निर्विकल्प पूर्ण मात । **देवनाथ** ध्यात हृदयिं, गात सतत प्राणी० ॥ तारक ॥४॥

## पद १७५.

तें ब्रह्म गोजिरें हो । खेळे यमुनातीरीं ॥ ध्याताति योगि ध्यानीं । व्यापक जें चराचरीं ॥ ध्रु० ॥ नाना लीला खेळ करी । गोप गडी मिळवूनि ॥ वर्णितां गुणगणगाथा । शिणली शेषाची वाणी ॥ तें ब्रह्म० ॥ १ ॥ दधिपयनवनीत । भक्षिताहे चोरुनी ॥ बांधिती हृदय-स्तंभीं । निजभावें गौळणी ॥ तें ब्रह्म० ॥ २ ॥ यशोमति माय ज्याची पिता जयाचा नंद ॥ अवतार भक्तकार्या । पूर्ण सच्चिदानंद ॥ तें ब्रह्म०॥ ३ ॥ धन्य भाग्य गौळियांचें । ज्यांचे घरां ब्रह्म नाचे ॥ वर्णितां वेदशास्त्रां । पडे गाढ मौन वाचे ॥ तें ब्रह्म० ॥ ४ ॥ कांबळी खांदां काळी । हातीं काळीच काठी ॥ 'हो रे हो रे' शब्द करी । धांवे वत्सांचिया पाठीं ॥ तें ब्रम्ह० ॥ ५ ॥ वज्रांकुशध्वज चिन्हें । शोभताति पदाब्जीं ॥ कोटीरवी तेज लोपे । ज्याच्या पदनखतेजीं ॥ तें ब्रह्म० ॥ ६ ॥ पीतांबर कास कासे । गळां शोभे वैजयंती ॥ चतु-र्भुज शंखचक्र । गदा पद्म हें हातीं ॥ ७ ॥ विप्रपद चिन्ह धरी । जो कां आपले हृदयीं ॥ त्रैलोक्यनाथ गोकुळीं । नांदे स्वयें शेषशायी॥ तें ब्रह्म० ॥ ८ ॥ मयूरमुगुट शिरीं । मकराकृति कुंडलें ॥ आकर्ण नेत्र शोभताती । भव्य तेज फांकलें ॥ तें ब्रम्ह० ॥ ९ ॥ सुंदर दिस-ताहे । सरळ नासिकशोभा ॥ कमलनयन देवराव । केवळ गगनाचा गाभा ॥ तें ब्रह्म० ॥ १० ॥ कुंदरदन मंदहास्य । दीननाथ गोपाळा ॥ अनंत ब्रम्हांडें हीं । पोटीं सांठविली कळा ॥ तें ब्रम्ह० ॥ ११ ॥ देवनाथ प्रभु ज्यासी । शिणल्या वर्णितां श्रुति ॥ तेथें मज पामराची । काय चालेल मती ॥ तें ब्रह्म० ॥ १२ ॥

## पद १७७.

निबिड सघन हे मध्य शार्वरी हरि वाजवि मुरली । मम मानस वश झालें विशेषें मति त्या रविं मुरली ॥ ध्रु० ॥ भर्ता भोक्ता अलिसुमशरतनु अब्जि ऐक्य असतां । भव्य सुखद रव मंजुळ गुरुतर तैं श्रवणीं बसतां ॥ हिमनगजापतिचा अरिसायक होय हृदयिं सलता । पदचालीं अलि तसीच वृंदावनिं कोणी नसतां ॥ चाल ॥ लागला छंद त्या रवांत सुमनाचा ॥ विगलीत वसन पथ धरीत भ्रमणाचा ॥ लक्षोनि अयन चालत फणिशयनाचा ॥ टिप ॥ प्रपंचिं अरुची धरि, रुचि हरिपदसरोजाचि वरिली । तगमग अति जिविं लगबग करुनी वनवृंदीं शिरली ॥ १ ॥ कनककमल मृदुमृणाल अशनी वहन गहन ज्याचें । मुक्तीमखगत प्रमुख मनोहर मुख तत्पितयाचें ॥ बालमेहरशत लज्जित गति बा भालचंद्र ज्याचें । नाम जपत, शमदाह गरळ गळरूप बंद्य प्रभुचें ॥ चाल ॥ मनमीन आकळी बळें प्रेमसूत्रें ॥ रवबाण हाणितां भेदि मोहयंत्रें ॥ तनुभावरहित जाहलीं गलित गात्रें ॥ टिप ॥ रमारमण निजवदन विलोकुनि मति जी अनुसरली । गरसम घर करि हरहर रवगति हृदयीं संचरली ॥ निबिड० ॥ २ ॥ सजल सघन घन वळला गरगर सभर स्त्रवति बिंदू । सजल चीर अतिरुचिर समीरण ये साधित द्वंद्व ॥ न गणुनि श्रम मम मानस धरि ईशपदांबुजीं छंदू । आनंदसिंधु दीनबंधु रविजातीरिं ब्रह्मानंदू ॥ चाल ॥ स्वानंदपूर्ण निरखितां रूप नयनीं ॥ समरसें चित्त सांठवी

हृदयभुवनीं ॥ नासला भास जाहली ऐक्यमिळणी ॥ टिप ॥ पूर्ण ब्रह्म गोविंदजिची श्रीमूर्ति मनीं भरली । **देवनाथ** सायुज्यवृत्ति त्या सुखांत तरतरली ॥ निबिड० ॥ ३ ॥

## पद १७८.

जो तुम तोडो पिया मैं नहिं तोडूं । तोरी प्रीत तोडी संग कोन कृष्ण जोडूं ॥ ध्रु० ॥ तुम भये तरुवर मैं भयि पखिया । तुम भये सरोवर मैं तेरी मछीया ॥ जो तुम० ॥ १ ॥ तुम भये गिरिवर मैं भयो चारा । तुम भये चंदा हम भये चकोरा ॥ जो तुम० ॥ २ ॥ तुम भयो मोती प्रभू हम भये धागा । तुम भये सोना हम भये स्वागा ॥ जो तुम० ॥ ३ ॥ बाई **मीरा** कहे प्रभु ब्रजके बाशी ॥ तुम मेरे ठाकोर मैं तेरी दासी ॥ जो तुम० ॥ ४ ॥

## पद १७९.

लागला चटका । हा प्रपंच अवघा लटका ॥ ध्रु० ॥ चटका लागला मिरेला । छळुनि विष दिधलें तिजला । निर्भय होऊनियां मनाला । घेतला घुटका ॥ १ ॥ चटका लागला कबिराला । छळूं संत आले घराला । बायको विकून सावकाराला । मारिला फटका॥२॥ चटका लागला जनीला । सोडुन दिधलें गणगोताला । वेगळें होऊनि जन्ममरणाला । तोडिला तटका ॥ ३ ॥ चटका लागला **विठ्ठलाला** । शरण ब्रह्मानंदपदाला । विसर न पडे दिवा निशीला । लवपळ घटका॥४॥

## पद १८०.

कोणिकडे तुम्हां जातां, जातां जिवलगा । घडिभर बसा गोष्ट सांगा ॥ ध्रु० ॥ विरह तुमचा जी, तुमचा जी साहीना । चित्त पायाविण पाहीना ॥ माझी कशी दया, दयाच येईना । कठिणता काय

म्हणुनि स्वमना ॥ तुम्हीं धरियली धरियली जगज्जीवना । हात जोडितें विनति माना । दासी मी तुमची, तुमची जिवलगा ॥ घडीभर० ॥ १ ॥ आधिं घेतलें, घेतलें मला पदरीं । लोटितां काय म्हणुनि दूरी ॥ आहें अपराधी, अपराधी गोष्ट खरी । अंगिकारिल्यावरी दूरी ॥ उपेक्षूं नये, नये जी निर्धारीं । शरण आलिया दीनोद्धारीं । चला या घरीं, घरीं लागवेगा ॥ घडीभर० ॥ २ ॥ साधनांतरीं, अंतरीं लक्ष कोटी । साधली बहु तुम्हांसाठीं ॥ गिरिकंदरीं कंदरीं जी कपाटीं ॥ बैसलें धैर्य धरुनि पोटीं ॥ योग साधिला, साधिला महाहाटीं । झालें मी फार हिंपुटी ॥ दृष्टि तुम्ही न पडा, न पडा भवभंगा ॥ घडीभर० ॥ ३ ॥ अंतरगृहीं, गृहीं जी सात बंकीं । अष्टभावाच्या पर्यंकीं । प्रेमभरित म्यां, भरित म्यां रचिली कीं । भक्तिनें सुमनसेज निकी ॥ लहर मदनाची, मदनाची महाबांकी । दुःख दे मला जाचते कीं ॥ चला या त्वरें, त्वरें अंगसंगा ॥ घडीभर० ॥ ४ ॥ द्वैत अद्वैत, गाळुनियां सहज । स्वरूपीं अखंड मन विरजे ॥ अक्षयीं पहुडूं पहुडूं सुखसेजे । भोगूं स्वानंद सायुज्य ॥ हेंचि मागणें मागणें गुरुराजे । इतुकें दान मला दीजे ॥ **देवनाथा**च्या नाथाच्या अंतरंगा ॥ घडीभर० ॥ ५ ॥

## पद १८१.

ऐसा उपकार कैसा विसरूं श्रीरामा । बहुत भाग्यें भेटलासी देवा निज सुखधामा ॥ ध्रु० ॥ दुर्लभ हे नरतनु देउनियां आम्हां । भक्तिमार्गें लावियलें पूर्ण परब्रह्मा ॥ १ ॥ घडी घडी कळविसी आपणचि सार । वळवुनी वृत्ति देसी आत्मपदीं थार ॥ २ ॥ विषयजनित सुख दुःख समजाया । भली युक्ति केली विस्तारुनि मिथ्या माया॥३॥

धन्य हा प्रपंच केला आत्मदृष्टि सारा । अखंड आनंद दाटे करितां विचारा ॥ ४ ॥ तुजविण देव दयाघन नाहीं कोणी । आत्मभावें **कृष्ण जगन्नाथ** लोटांगणीं ॥ ५ ॥

## पद १८२.

या मनाचा काम पुरविता राम जगाचा स्वामी । नाम गातां शामसुंदर प्रगटे अंतर्यामीं ॥ ध्रु० ॥ वाम जानुवरि जानकि शोभे वामलोचना साजे । काम मनोहर मूर्ति जगन्मय धाम सुखाचें गाजे ॥ ॥ १ ॥ भला जन्म लाधला गड्यांनों चला अयोध्ये जाऊं । न लाभ याहुनि मला वाटतो कलाकुशल हरि गाऊं ॥ २ ॥ थाट शोभतो कीर्तन गजरें दाट समूह संतांचा । वाट फुटेना गांठुनि ध्याया, ब्रह्मानंदचि साचा ॥ ३ ॥ **विष्णु कृष्ण जगन्नाथ** सदा प्रेमळ भक्त जनाचा । अखंड भजनीं तो दिनरजनीं लंपट निजनामाचा ॥ ४ ॥

## पद १८३.

पुरवि मनाची तान राम आनंदनिधान । नुरवी देहभान ज्याचें ध्यान छान छान ॥ ध्रु० ॥ विश्रांतीचें स्थान दे मज सुख समाधान । नाहीं ज्यासमान व्यापक आन मान मान ॥ १ ॥ **विष्णु कृष्ण जगन्नाथ** निजानुसंधान । धरितां भगवान करवी अमृतपान पान ॥ २ ॥

## पद १८४.

भाग्यवंत ऐसा मनुजा तुझ्यासम कोणिच नाहीं ॥ ध्रु० ॥ म्हणसी भाग्य माझें कैसें । हृदयिं राम प्रगटे ऐसें । जैसें कर्म करिसी तैसें । प्राप्त फळ न संशय कांहीं ॥ १ ॥ जरि तूं जाउनि करिशिल चोरी । मार खाशिल परोपरी । आपुला आपण होउनि वैरी । दंड होति

ते ते साही ॥ २ ॥ मुखें नाम हातीं टाळी । वाजवि त्याचीं विघ्नें टाळी । विसंबेना कधिं वनमाळी । मागें पुढें रक्षित राही ॥ ३ ॥ नवविधा भक्ति केली । ब्रह्मानंद पदवि उदेली । दुःख दुर्दशा ते गेली । सांडुनियां दिशा दाही ॥ ४ ॥ जरि तूं होता वृषभ गाई । श्वान सूकर नव्हति बढाई । भवगद्भक्ति घडती काई । आप आपणांत पाहीं ॥ ५ ॥ मनुष्यजन्म पदवि न थोडी । पुनर्जन्मबंधन तोडी । लागेल जरी सज्जन–गोडी । न पडवी दुःखप्रवाहीं ॥ ६ ॥ जरी दाटुनि पापें करिसी । लक्ष चौऱ्यांशीं योनी फिरसी । जन्मुनि जन्मुनि पुनरपि मरसी । श्वानसूकर होउनि गाई ॥ ७ ॥ संतसंग जरि तूं धरिसी । आत्मज्ञानें भवनिधि तरसी । पूर्ण आनदांतचि भरसी । देति वेदशास्त्रें ग्वाही ॥ ८ ॥ **विष्णु कृष्ण जगन्नाथाला ।** सत्यत्वें हा अनुभव आला । म्हणुनि कळवितों सर्वांला । गोष्टि अंतरांत धरा ही ॥ ९ ॥

## पद १८४

कळों आली माव रे । भक्तीपाशीं देव रे । न पाहेचि याती कुळ कर्ममूळ भाव रे ॥ ध्रु० ॥ कोण पुण्यश्लोक रे । गोकुळींचे लोक रे । गोपवेषें जयां घरीं ब्रह्मांडनायक रे ॥ १ ॥ दुर्लभ ब्रह्मादिकां । त्यासी गोपबाळिका । प्रेमें नाचविती वाजवोनी करताळिका ॥ २ ॥ प्राणाच्या निरोधनें । नव्हे साध्य साधनें । लीलारूपी विग्रही तो चारिताहे गोधनें ॥ ३ ॥ भाविकांचे बंध रे । तोडी जगद्वंद्य रे । यशोदेनें उखळीं तो बांधिला गोविंद रे ॥ ४ ॥ जया जैसा हेत रे । तया तैसा होत रे । **निजानंदीं** पूर्ण **रंगीं** रंगला अनंत रे ॥ ५ ॥

## पद १८६.

बसुनि सुखें चिंतित जा रघुवीर ॥ ध्रु० ॥ अल्प सुखास्तव व्यर्थ विकुं नका । क्षणिक अमूल्य शरीर ॥ १ ॥ चित्रगुप्त बरदास्त लिहितसे । विषयाची तकरीर ॥ २ ॥ हरिभजनें कामादिक पळती । मोठे सबळशरीर ॥ ३ ॥ गुणलेखक मोहरीर अमृत घरिं । बसल्या घेत हरीर ॥ ४ ॥

## पद १८७.

वैराग्यभाग्यासारिखें भाग्य नाहीं ॥ ध्रु० ॥ परि तो विवेक मुख्य असावा । साधनमात्रालागीं विसांवा । संतसमागम हा गिंवसावा । संशय सकळ पुसावा । किमपि नसावा कांहीं ॥ वैराग्यभाग्या० ॥१॥ डोइस टोपी कीं चिंधोटी । गडवा पुरे एक लंगोटी । समयीं भाकर तुकडा रोटी । हरि हरि जपूनि राहीं ॥ वैरा० ॥ २ ॥ जुन्या चिरगुटांची भरती । कंथा असो पाठीवरती । वितभर भुई अंगापुरती । देहममता सांडुनि परती । सच्चिदानंद पाहीं ॥ वैरा० ॥ ३ ॥ हत्ती घोडेपालल्या उंटें । त्याचे मार्गे उदंड झटें । कारभाराचें व्यसन खोटें । जैसे फुटके पेटे । बुडविति मध्यप्रवाहीं ॥ वैरा० ॥ ४ ॥ सेवक **अमृतराय** संतांचा । हाची पूर्ण मनोरथ त्याचा । अर्पित काया मन वाचा । अंतर्बाह्य व्यापक साचा । यासी विठ्ठल रुक्मिणी ग्वाही ॥ वैरा० ॥ ५ ॥

## पद १८८.

प्राण्या भुलूं नको नटूं नको स्वहिता अंतरसी ॥ ध्रु० ॥ हा देह पांचांचा पांचांचा । पांच जण नेतील । जीव हा अज्ञानी

न्यायाला । धर्मदूत येतील । हिशेब पापाचा पुण्याचा । चित्रगुप्त घेतील । केल्या कर्माचें फळ बापा । अवश्य ते देतील ॥ १ ॥ वेदशास्त्रांच्या उपदेशें । निरभिमानी होय । राहें लीनपणें सर्वांशीं । जैसें पातळ तोय । क्षमा आत्मत्वें धरावी । अबोलणीं जणुं भूय । आत्मविचारें पुसावी । संतजनांतें सोय ॥२॥ वैभव जायाचें जायाचें पापबळें जाईल । सत्ता श्रीहरिची श्रीहरिची । तो हिरून नेईल । होईं सावध सावध रे सावध रे । तरिच बरें होईल । क्षेम केल्याणा कल्याणा । **अमृतेश्वर** देईल ॥ ३ ॥

## पद १८९.

अखंड हरि हरि वदा । रे बापानों । किति सेवाल धन दुर्मदा ॥ रे० ॥ ध्रु० ॥ काय रानांत आटल्या नद्या । काय तरू म्हणति फळ न द्या॥ गेली आजची घडी नये उद्यां ॥ रे बापानों० ॥ १ ॥ काय बिदींत न मिळती चिंध्या । काय न मिळे भोंपळा दुध्या ॥ या तों गोष्टी सुखाच्या सुध्या । वाचा एकोबाचा भागवत अध्या ॥ २ ॥ काय पर्वतिं बुजल्या दऱ्या । काय दुकाळ पडला कऱ्या । काय महर्घ तृणाच्या बोऱ्या । या तों वैराग्याच्या युक्ति खऱ्या ॥ ३ ॥ काय लोकिं दारवंठे रोधिले । काय न मिळती जुने जोंधळे । ऐसें टाकुनि दुर्मद आंधळे । व्यर्थ अमोल आयुष्य उधळे ॥ ४ ॥ बाहू असतां आपणापाशीं । मग कशासि पाहिजे उशी । काय अडचण महदाकाशीं । ठाव नेदी काय पृथ्वी कुशीं ॥ ५ ॥ कर जोडुनी **अमृत** **विनवितो । बाहू उभारोनि गर्जतो ।** जो निश्चय धरुनी बैसतो । **त्याला घरिं बसल्या राम देतो ॥ रे० ॥ ६ ॥**

## पद १९०.

बा तुझा चालता काळ । खायाला मिळती सकळ ॥ ध्रु० ॥ हे कोण बायकोचे मामे । घरांत वागती रिकामे । साखर शाल्योदन रुजामे । भोजनभाऊ केवळ ॥ १ ॥ हे कोण बायकोचे साले । तुपावेगळा घांस न गिळे । तांदुळ रांधावे मोकळे । केलें बेंबीचें उखळ ॥ २ ॥ सासू मेहुण्या घरांत येती । फराळाच्या बसती पंक्ती । नातें कोरकोरुनी काढिति । अवघा मायेचा गोंधळ ॥ ३ ॥ अमृतराय म्हणे रे मूर्खा । किति भुललासि मायेच्या सुखा । अंतीं जाशिल एकटा नरका । भज सद्गुरू दयाळ ॥ ४ ॥

## पद १९१.

मोका का तूं ढूंढे बंदे मै तो तेरे पासमें । ना मैं कोई क्रियाक-र्ममें ना जोग संन्यासमें ॥ ध्रु० ॥ ना मैं पोथी ना मैं पंडित ना काशी कैलासमें । ना रहता मैं श्रीद्वारका ना रहता जगन्नाथमें ॥१॥ ना रहता मैं रामेसरमें ना रहता बद्रीनाथमें । ना रहता मैं जंगल सहारा, मैं रहता विश्वासमें ॥ २ ॥ कहत कबीरा सुनो भाई साधो सब श्वासोंके श्वासमें । जो खोजे तो तुरत मिळूं मैं छनभरकी तल्लासमें ॥ ३ ॥

## पद १९२.

मोरोबा यावें । समयाला सादर व्हावें ॥ ध्रु० ॥ कोठिल पक्वानें मी वाढूं । तुजला क्षिप्रा मोदक लाडू । आतां मी कर्ज कुणाचें काढूं । काय बोलावें ॥ समयाला० ॥ १ ॥ कुठिल दुधभात आणि कढी । कुठली उष्णपोळी खिचडी । भाजीभाकर आहे या घडी । तुम्ही पहावें ॥ समयाला० ॥ २ ॥ सोडुनि जनकनृपाची पुरी । त्रिशिरा

विरोचनाचे घरीं । दुर्वा भक्षुनि तृप्त अंतरीं । होसि सद्भावें ॥ समयाला० ॥ ३ ॥ विनवी **रामभक्त मल्हारी** । तुजला प्रार्थितसे कमलारी । भक्षुनि माझी भाजिभाकरी । सफळ करावें ॥ समयाला० ॥ ४ ॥

## पद १९३.

राम गोसावी कीं जाहला । अवघे मिळोनि पाहुं चला ॥ ध्रु०॥ काढुनि मोतियांची आंगी । दिव्य विभूति लावी अंगीं । जैसा भव्य पुरातन योगी । शरयूतीरीं बैसला ॥ १ ॥ फेंकुनि दिला बादली चिरा । वाटिला मोतियांचा तुरा । फेडुनि पिवळ्या पीतांबरा । वनीं वल्कलें नेसला ॥ २ ॥ आतां होउनी बेजार । काढी किनखापाची विजार । जैसी जुनी तुटकी पैजार । तैसें राज्य झुगारिलें ॥ ३ ॥ धाडुनि लक्ष्मणा सुभटा । चीक आणिला प्रार्थुनि वटा । मऊ केशाच्या केल्या जटा । दिव्य तांबड्या धगधगित ॥ ४ ॥ उदास होउनि सुवर्णनगीं । सन्निध सीता बैसली उगी । भेटीस न लगे परवानगी । उघडें दर्शन चांगलें ॥ ५ ॥ भरतें रामातें विनविलें । त्यासि पादुका भाग्य दिल्हें । चौदा वर्षे राज्य भलें । करितिल आतां पादुका ॥ ६ ॥ मर्दुनि रावणा कंटका । स्वधर्म स्थापुनियां नेटका । स्वार्जित राज्याच्या पादुका । पायीं घालिल दिसताहे ॥ ७ ॥ येथें बहुत फार कष्टलों । नाना दुःखांहीं वेष्टिलों । ब्रह्मानंदांतुनी भ्रष्टलों । होईल लाभ तेथें हो ॥ ८ ॥ ब्राम्हण ब्रह्मनिष्ठ भंवताले । रामदर्शनातें आले । भगवच्चर्या करूनि जाले । ब्रम्हानंदीं निमग्न ॥ ९ ॥ तेथें चांगला एकांत । निवळ होताहे वेदांत । क्षणभरि करूं चला विश्रांत । हा गृहधंदा सोडूनिया ॥ १० ॥

रामें सोडुनि दिधला कोप । जटा गुंडाळुनि केला टोप । केवळ वैराग्याचें रोप । अक्षय शरीर रामाचें ॥ ११ ॥ करुनी पर्णकुटीची मठी । भगवी ध्वजा उभवी गुढी । नाहीं चोपदार देवडी । दाही दिशा मोकळ्या ॥ १२ ॥ जवळी नाहीं मणी फुटका । तेथें कैंचा जरी पटका । हा तव परमार्थ नेटका । विवेकासी आणिला ॥१३॥ सेवक अमृतराय भगवान् । त्याला अखंड हेंची ध्यान । आपले जातीचें महिमान । ज्याला त्याला आवडे ॥ १४ ॥

## पद १९४.

अरे मी भीष्म जरीच तरी श्रीहरी । धरविन चक्र करीं ॥ ध्रु० ॥ क्षत्रियकुळींचा सुत शंतनुचा । जन्मलों शुभ जठरीं ॥ हरिपदिं जन्मुनि शिवमौळिं वसे । त्या गंगे उदरीं ॥ श्रीहरी० ॥ १ ॥ सायुध यादव चक्ररहित तूं । निश्चय करिसि तरी ॥ सांप्रत मजला कळों येइल रे । या अनुपम समरीं ॥ श्रीहरी० ॥ २ ॥ ध्वजरूपी हरि हय तेहि हरी । सारथि मुख्य हरी ॥ हरिमय रथ हा विजय श्रीहरि । मी यातें प्रहरीं ॥ श्रीहरि० ॥ ३ ॥ पाहिं मी शिष्य भार्गवरामाचा । कोपल्या न उरे उरी । अमृतवचनें सत्य प्रतिज्ञा । ऐकिजे रणरंगचतुरीं ॥ श्रीहरि० ॥ ४ ॥

## आरती १९५.

अवतार गोकुळीं हो जन तारावयासी । लावण्यरूपडें हें तेजःपुंजाळ राशी । उगवतां कोटि बिंबें रपि लोपले शशी । उत्सव सुरवरां महिमा थोर मानसीं ॥ १ ॥ जयदेवा कृष्णनाथा जय रुक्मिणीकांता । आरती ओंवाळीन तुम्हा देवकीसुता ॥ ध्रु० ॥ वसुदेव देवकीची फोडिली बंदिशाळा । होउनि विश्वजनिता तया पोटिंचें बाळ ।

दैत्य हे त्रासियेले समूळ कौंसासी काळ। राजया उग्रसेना केला मथुरापाळ ॥ २ ॥ चारितां गोधनें हो इंद्र कोपला भारी। मेघ जो कडाडिला शिळा वर्षतां धारीं। रक्षिलें गोकुळ हो नाखिं धरुनियां गिरी। निर्भय लोकपाळ अवतरले हरी ॥ ३ ॥ कवतुक पहावया माव ब्रह्मयानें केली। वत्सें हीं चोरुनियां सत्यलोकासि नेलीं। गोपाळ गाई वत्सें दोहिं ठायीं रक्षिलीं। सुखाचा प्रेमासिंधू अनाथाची माउली ॥ ४ ॥ तारिले भक्तजन दैत्य निर्दाळेनी। पांडवां साहकारी आडल्या निर्वाणीं। गुण मी काय वर्णूं मति केवढी वाणी। विनवितो दास **तुका** ठाव मागे चरणीं ॥ ५ ॥

## प्रभाती १९६.

जागिये कृपानिधान जानराय रामचंद्र जननि कहे बार बार भोर भयो प्यारे ॥ राजिवलोचन विशाल पीत वापिका मराल ललित बदनकमल उपर मदन कोटि वारे ॥ अरुण उदित विगत शर्वरी शशांककिरन हिन दीन दीपज्योति मलीन द्युतिसमूह तारे ॥ मनोज्ञान घनप्रकाश बीते सब भवविलास आश त्रास तिमिर तोष तरनितेज जारे ॥ बोलत खगनिकर मुखर मधुर कर प्रतीत सुनो श्रवण प्राण जीवन धन मेरे तुम बा रे ॥ मनोवेद बंदी मुनिवृंद सूतमागधादि बिरद वदत जय जय जय जयति कैटभारे ॥ बिकासित कमलावली चले प्रपुंज चंचरीक गुंजत कलकोमल धुनि त्याग कंज न्यारे ॥ मनोविराग पाय सकल शोककूप गृह विहाय भृत्य प्रेम मत्त फिरत गुणत गुण तिहारे ॥ सुनत वचन प्रिय रसाल जागे अतिशय दयाल भागे जंजाल बिपुल दुःख कदंब टारे ॥ **तुलसिदास** अति आनंद देखके मुखारविंद छूटे भ्रम फंद परम मंद द्वंद्वभारे ॥

## पद १९७.

रसने न राघवाच्या थोडी यशांत गोडी ॥ ध्रु० ॥ निंदास्तुती जनाच्या । वार्ता वधूधनाच्या । खोट्या व्यथा मनाच्या । कांहीं न यांत जोडी ॥ १ ॥ साधूंचिया सदातें । सुख देतसे सदा तें । श्रवणीं सुधा मदातें । सोडोनि हात जोडी ॥ २ ॥ विनवी **मयूर** भावें । सखि हेंचि नित्य गावें । मजला द्रवोनि द्यावें । दुसरें न बंध तोडीं ॥ ३ ॥

## पद १९८.

सद्गुरुराय दिधली जे संपत्ति । देखुनी इंद्र चंद्र चकित होती ॥ ध्रु० ॥ सहजानंद अक्षय आमुचें धन । देतां भोगितां नोहे कदा क्षीण ॥ १ ॥ निगम दुंदुभि वाजे आमुचिये द्वारीं । परिचारिका असती मुक्ति चारी ॥ २ ॥ बोध क्षमा दया आमुची बाळें । चिन्मयभुवनीं खेळती अद्वयखेळें ॥ ३ ॥ सहज स्थिति आमुचें सिंहासन । वरी बैसोनी आज्ञा चाले पूर्ण ॥ ४ ॥ सार्वभौमता वसे आमुचे ठायीं । सत्तेवांचोनि काळदेश नाहीं ॥ ५ ॥ **वासुदेव** श्रीगुरुचें उदरिं आला । गर्भश्रीमंत नित्य होउनि ठेला ॥ ६ ॥

## पद १९९.

तुज काय म्हणावें आम्हीं । दयाळू नाथ जगाचा तूं स्वामी० ॥ ध्रु. ॥ पावन ब्रीद तुझें गा कंसारी, वेद गर्जती चारी । पतित तारिले त्वां बहुभारी, गजगणिका व्यभिचारी ॥ एकुनि कीर्ति तुझी बा पूतनारि, शरणागत मी द्वारीं । आलों ठेविं मला निज पदपद्मीं ॥ तुज० ॥ १ ॥ आदौ पल्लविं उचलुनियां ध्यावें मग परतें लोटावें । दिसतें उचित [illegible] ॥ [illegible] जनीं म्हणवावें, तेणें

विलया जावें । नवल वाटतें अंतर्यामीं ।। तुज० ।। २ ।। करुणासागर श्रीगोपाळा, कृष्णा, त्रिभुवनपाळा । पांडवपाळका जी घननीळा, नंदयशोमतिबाळा ।। झालें मानस हें अति विकळा, तव विरहाग्निज्वाळा । दुःखित झालों मी बहुत श्रमीं ।। ३ ।। विश्वोद्धारका गुरुगोविंदा, किती भोगावी आपदा । सरली आयुष्याची मर्यादा, काळें काढिल्या फरदा ।। अजुनि दया येईना का मर्दा, बोल परमानंदा । रतला **देवनाथ** प्रभु या नामीं ।। तुज० ।। ४ ।।

## पद २००.

जाग रे जाग बापा, विश्वपालका कृष्णा । दीन आम्ही उभे द्वारीं, आमची बोळवीं तृष्णा ।। ध्रु० ।। त्रासलों प्रपचीं या, बहु कष्टलों भारी । म्हणवुनि शरण आलों, विभो ! तुझिया द्वारीं ।। जाग रे० ।। १ ।। सांग बा न्यून काय, हरि तुझिया भांडारीं । याचक भीक मागें, प्रेम देईं झडकरी ।। जाग रे० ।। २ ।। गुरुकृपें उदयो झाला, हरि उदया आला । सुख तें काय सांगूं, जिवलग भेटला ।। जाग रे० ।। ३ ।। श्रीगुरुनाथराया, कृपासिंधू गोविंदा ! । **देवनाथ** प्रार्थिताहे प्रभुपदारविंदा ।। जाग रे० ।। ४ ।।

## पद २०१.

रमाकांत नये मी वो सये काय करूं ।। ध्रु० ।। दूर करुनि चंदनासि । दावि नंदनंदनासि । शशिकळा गमति रोग । नको सजणि भांग भरूं ।। रमा० ।। १ ।। श्रम मनिं बहु दाटताति । युगसम पळ वाटताति । म्लान वदनचंद्र नको । दर्पणासि हातिं धरूं ।। रमा० ।। १ ।। नवस करुनि चंडिकेसि । दावि मला हृषीकेशि । **कृष्णदास विरहसिंधु** । सांग सखे ! केवि तरूं ।। रमा० ।। ३ ।।

## पद २०२.

आणाना यदुराज । झडकरि आणाना यदुराज ॥ ध्रु० ॥ माळ गळ्यांतिल व्याळसमचि, घननीळ नये सदनाला । वेळ नका बहु लावुं तयाविण राहीना जीव आज ॥ झड० ॥ १ ॥ भोग सुखादिक रोग गमती वियोग न साहे सद्यांनों । वेगिं आणि सये बाई तयाविण राहीना मम प्राण ॥ झड० ॥ २ ॥ नंदतनय व्रजवृंदसहित कालिंदितटीं करि लीला । मंदिरिं आणि सखे **रमणात्मज** वंदित पादसरोज ॥ ३ ॥

## पद २०३

येउं दे दया, दया देवदेवा । शरण मी तुला वासुदेवा ॥ ध्रु० ॥ गुंतलों माया, मायामोहपाशीं । जीव दुःखित बहु परदेशी ॥ कशी गत करूं करूं हृषीकेशी । प्राण घाबरा कधीं येशी ॥ आज कीं उद्यां, उद्यां किंवा परवा । शरण मी० ॥ १ ॥ कमललोचना, लोचना कनकवसना । कर्ममोचना गरुडवहना ॥ पतितपावना, पावना जी मनमोहना । कशी तुज नये माझि करुणा ॥ दीन मी नेणें, नेणें भक्तिभावा । शरण मी० ॥ २ ॥ कुंदद्युती द्युती मंदहासा । दीनबांधवा श्रीनिवासा ॥ विश्वजीवना, जीवना काय ऐसा । किती मजविशीं धरिशि आळसा ॥ वर्णूं मी किती, किती कीर्ति केशवा । शरण० ॥ ३ ॥ पतित तारिले, तारिले बहु भारी । कीर्ति ऐकुनि आलों द्वारीं ॥ रमानायका, नायका जी ! कंसारि । पतित एवढा भव भारी ॥ कीर्ति यशध्वजा , ध्वजा आजि उभवा । शरण० ॥ ४ ॥ भक्ति बाहतों, बाहतों हरी ! तुजला । कदा बससी न बाउगला । येसी धांवुनी, धांवुनी कसा प्याला । मिराबाईस्तव विष-

प्याला ॥ माझी कां नये, नये सख्या ! कणवा ॥ शरण० ॥ ५ ॥ चिरें पुरवुनी, पुरवुनी सत्य साची । लाज रक्षिलि त्वां भगिनीची ॥ होसी माउली, माउलि निजः दासांची । चित्सागरा दयावीची ॥ लोटिं मजवरीं, मजवरि दे निज विभवा ॥ शरण मी० ॥ ६ ॥ स्वामी सद्गुरु, सद्गुरु **श्रीगोविंदा** । परमपुरुषा परमानंदा ॥ अविट अक्षया, अक्षया परमसुखदा । तोडिं हे मायिक अघ आपदा ॥ होऊं नेदिं या, नेदिं या ज्ञानगर्वा ॥ शरण० ॥ ७ ॥ प्रार्थितों अति, अती विनित भावें । श्रवण देवोनि ऐकावें ॥ कृपासागरा, सागरा त्वरित यावें । **देवनाथा**सि अपंगावें ॥ दीन आपुला, आपुला मला म्हणवा । शरण मी० ॥ ८ ॥

## पद २०४.

माझि विनवणी, विनवणि हरिला सांगा । कधीं भेटाल पांडुरंगा ॥ ध्रु० ॥ संत तुम्हि दयाळ, दयाळ करूनि कृपा । भेटवा केशव मायबापा ॥ भवाब्धीमधें, मधें बुडतो तापा । कोण दाखवी मार्ग सोपा ॥ चाल ॥ काय मी करूं । कोणता मार्ग तरि धरूं ॥ किति म्हणुनि चित्त आवरूं । आवरूं अंतरंगा ॥ कधिं० ॥ १ ॥ गोपीवल्लभा वल्लभा गोपवेषा । कधीं दाविशी पादरेषा ॥ वोस तुजविणा तुजविणा दाहि दीशा । विरहीं जाल्या वृत्ति पिशा ॥ चाल ॥ जीव घाबरा । भवनदी खोल भोंवरा ॥ बुडतों या जी ! सांवरा । सांवरा लागवेगा ॥ कधीं० ॥ २ ॥ जाहली बहू, बहू वाढवेळा । कठिणता धरिलि हृदयकमळा ॥ काय म्हणुनियां, म्हणुनियां जी घननीळा । त्वां धरियली विश्वपाळा ॥ चाल ॥ दीनोद्धारणा । भक्तवत्सल भय-

पाय धरुन ओढी मटकन् । जशि नंगी समशेर देहाचे तुकडे तुकडे करि कटकन् ॥ फिर मागें ॥ २ ॥ श्रीगुरु **गोविंदराय** निरंजन पादरेणु जेव्हां वरिला । आत्मा मी हा ब्रह्म सनातन शुद्ध भाव तेव्हां कळला ॥ जिकडे पाहे तिकडे अवघा चराचरीं चिद्घन भरला । एकपणीं ऐक्यत्व लाधलें द्विधा भाव सर्वहि हरला ॥ पुरला हेतू नयनद्वारें हृदयसरोजीं गुरु भरला । **देवनाथ** म्हणणेंचि आटलें लवण जळीं तैसा विरला ॥ विरला पुरला भरोनि उरला तो सुमनें गिळिला गटकन । देह विदेही स्थिति बाणली जन्ममरण खंडित खटकन ॥ धन्य गुरु ॥ ३ ॥

## कांकड आरति २०७.

सहस्र दीपें दीप कैसी प्रकाशली प्रभा । उजळल्या दशदिश गगना आलीसे शोभा ॥ १ ॥ कांकड आरती माझ्या कृष्ण सभागिया । चराचर मोहरलें तुझी मूर्ति पहाया ॥ ध्रु० ॥ कोंदलेंसे तेज प्रभा झालीसे एक । नित्य नवा आनंद ओवाळितां श्रीमुख ॥ २ ॥ आरति करितां तेज प्रकाशलें नयनीं । तेणें तेजें मीनला **एका** एकीं जनार्दनीं ॥ ३ ॥

## प्रबंध २०८.

कृष्णा रामा रे सखया कृष्णा रामा रे । आनंदधामा रे माझ्या पूर्णकामा रे ॥ ध्रु० ॥ कृष्णा पूतनाशोषण, रामा ताटिका खोंचण । शोषण खोंचण, माझ्या कृष्णा रामा रे ॥ १ ॥ कृष्णा शकटदंडण, रामा धनुष्यखंडण । दंडण खंडण माझ्या कृष्णा रामा रे ॥ २ ॥

कृष्णा गुह्यकउद्धरण, रामा अहल्यातारण । उद्धरण तारण माझ्या कृष्णा रामा रे ॥ ३ ॥ कृष्णा व्रजनारीखेळण, रामा वानर मेळण । खेळण मेळण, माझ्या कृष्णा रामा रे ॥ ४ ॥ काळयवनदलन, विकट तालछेदन । दलन छेदन माझ्या कृष्णा रामा रे ॥ ५ ॥ कृष्णा यदुकुलहर्षण, रामा रघुकुलभूषण । हर्षण भूषण, माझ्या कृष्णा रामा रे ॥ ६ ॥ कृष्णा भीमकीहरण, रामा जानकीवरण । हरण वरण माझ्या कृष्णा रामा रे ॥ ७ ॥ **रमावल्लभ**दासपण, कृष्ण देतो आपण । तुझें चरणस्मरण, माझ्या कृष्णा रामा रे ॥ ८ ॥

## पद २०९.

विठ्ठल वाचे बोल, घडि घडि विठ्ठल वाचे बोल ॥ ध्रु० ॥ विठ्ठल-नामसुधारस सेवुनि ॥ विठ्ठल प्रेमें डोल ॥ घडि घडि० ॥ १ ॥ आसनिं शयनीं भोजनिं गमनीं । वद हें नाम अमोल ॥ घडि० ॥ २ ॥ तरला राघव विठ्ठलनामें । पाहतां रूप सखोल ॥ घडि० ॥ ३ ॥

## भूपाळी रामाची २१०.

जागिये रघुनाथ कुंवर पंखी बन बोले ॥ टेक ॥ चंद्रकिरण शीतल भई चकई पिय मिलन गई, त्रिविध मंद चलत पवन पल्लव द्रुम डोले ॥ १ ॥ प्रातभानु प्रकट भयो रजनीको तिमिर गयो, भृंग करत गुंज गान कमलवदन खोले ॥ २ ॥ ब्रह्मादिक धरतं ध्यान सुरनरमुनि करत गान, जागनकी बेर भई नयन पलक खोले ॥ ३ ॥ **तुलसिदास** अति अनंद निरखिकै मुखारविंद दीननको देत दान भूषण बहुमोले ॥ ४ ॥

## भूपाळी श्रीकृष्णाची २११.

उठीं गोपाळजी ! जाइं धेनूंकडे । पाहती सौंगडे वाट तूझी ॥ध्रु०॥ लोपली हे निशी मंद झाला शशी । मुनिजन मानसीं ध्याति तुजला ॥ १ ॥ भानु उदयाचळीं तेज पुंजाळलें । विकसती कमळें जळामाजी ॥ २ ॥ धेनुवत्सें तुला बाहती माधवा । उठीं गा यादवा उशिर जाला ॥ ३ ॥ ऊठ पुरुषोत्तमा ! वाट पाहे रमा । दाविं मुखचंद्रमा सकळिकांसी ॥ ४ ॥ कनकपात्रांतरीं दीपरत्नें बरीं । ओवाळिती सुंदरी तूजलागीं ॥ ५ ॥ जन्मजन्मांतरीं दास होऊं हरी । बोलती वैखरी भक्त तूझे ॥ ६ ॥ **कृष्ण केशव** करीं चरणांबुज धरी । ऊठ गा श्रीहरि मायबापा ॥ ७ ॥

## आरती कृष्णाची २१२

ओवाळूं आरती मदनगोपाळा । श्यामसुंदर गळां वैजयंती माळा ॥ ध्रु० ॥ चरणकमल ज्याचे अति सकुमार । ध्वजवज्रांकुश चरणीं ब्रीदाचा तोडर ॥ १ ॥ नाभिकमळ ज्याचें ब्रह्मयाचें स्थान । हृदयीं पदक शोभे श्रीवत्सलांछन ॥ २ ॥ मुखकमळ ज्याचें पाहतां सूर्याच्या कोटी । वेधियलें मानस हारपली सृष्टी ॥ ३ ॥ जडित मुगुट ज्याचा देदीप्यमान । तेणें तेजें कोंदलें अवघें त्रिभुवन ॥ ४ ॥ **एका जनार्दनीं** देखियलें रूप । रूपचि पाहतां अवघें झालें तद्रूप ॥ ५ ॥

## आरती रामाची २१३.

उत्कट साधुनि शिळा सेतू बांधोनी । लिंगदेहलंकापुरि विध्वंसोनी । कामक्रोधादिक राक्षस मर्दूनी । देहअहंभाव रावण निवटूनी ॥ १ ॥ जयदेव जयदेव निजबोधा रामा । परमार्थे आरती, सद्भावें आरती

परिपूर्णकामा ॥ ध्रु० ॥ प्रथम सीताशुद्धी हनुमंत गेला । लंका दहन करुनी अखया मारिला ॥ वधिला जंबूमाळी भुवनिं त्राहाटीला । आनंदाची गुढी घेउनियां आला ॥ २ ॥ निजबळें निजशक्ति सोडविली सीता । म्हणुनि येणें झालें अयोध्ये रघुनाथा ॥ आनंदें ओसंडे वैराग्य भरता । आरति घेउनि आली कौसल्या माता ॥ ३ ॥ अनुहतध्वनी गर्जेति अपार । अठरा पद्मे वानर करिती भुभुकार ॥ अयोध्येसी आले दशरथकुमर । नगरीं होत आहे आनंद थोर ॥ ४ ॥ सहज सिंहासनीं राजा रघुवीर । सोहंभावें तया पूजा उपचार । सहजाची आरती वाद्यांचा गजर । **माधवदास स्वामी** आठव ना विसर ॥ ५ ॥

## आरती २१४.

नाना देवीं देव एक विराजे । नाना नाटक लीला सुंदर रुप साजे । नाना तीर्थीं क्षेत्रीं अभिनव कीर्ति गाजे । अगाध महिमा तूझा ब्रम्हांडीं गाजे ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय आत्मारामा । निगमागम शोधितां नकळे गुणसीमा ॥ ध्रु० ॥ बहुरूपी बहुगुणी बहुता काळाचा । हरिहर ब्रम्हादिक देव सकळांचा । युगानयुगीं आत्माराम आमुचा । **दास** म्हणे महिमा न बोलवे वाचा ॥ जय० ॥ २ ॥

## आरती विठ्ठलाची २१५.

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्यशोभा । पुंडलिकाचे भेटी परब्रम्ह आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जग ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय पांडुरंगा । रखुमाईवल्लभा राहीच्या वल्लभा पावें जिवलगा ॥ध्रु०॥ तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटीं ।

कासे पीतांबर कस्तुरि लल्लाटीं । देव सुरवर नित्य येति भेटी । गरुड हनुमंत पुढें उभे राहती ॥ २ ॥ धन्य वेणुनाद अनुक्षेत्रपाळा । सुवर्णाचीं कमळें पद्माळा गळां । राई रुक्माबाई राणिया सकळा । ओंवाळिते राधा विठ्ठल सांवळा ॥ ३ ॥ ओंवाळूं आरत्या कुरवंड्या येती । चंद्रभागेमाजी सोडुनियां देती । दिंड्यापताका वैष्णव नाचती। पंढरीचा महिमा वर्णावा किती ॥ ४ ॥ आषाढी कार्तिकी भक्तजन येती । चंद्रभागेमाजी स्नान जे करिती । दर्शनहेळामात्र तयां होय मुक्ति । केशवासी **नामदेव** भावें ओंवाळिती ॥ ५ ॥

## आरती ज्ञानेश्वराची २१६.

आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा । सेवितो साधुसंत । मनु वेधला माझा ॥ ध्रु० ॥ कनकाचें ताट करीं । उभ्या गोपिका नारी॥ नारद तुंबर हो । सामगायन करी ॥ १ ॥ लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी ॥ अवतार पांडुरंग । नाम ठेविलें ज्ञानी ॥ २ ॥ प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें ॥ **रामाजनार्दनीं** । पायीं टकचि ठेलें॥ ३॥

## आरती विष्णूची २१७.

संत सनकादिक भक्त मिळाले अनेक । स्वानंदें गर्जती पाहूं आले कौतुक ॥ १ ॥ नवल होताहे आरती देवाधिदेवा । स्वर्गींहुनी सुरवर पाहूं येताति भावा ॥ ध्रु० ॥ नरनारी तटस्थ टक पडिले नयना । श्रीमुख पाहतां धणी न पुरे मना ॥ २ ॥ **एकाजनार्दनीं** मंगल आरत्या गाती। मिळाले वैष्णव जयजयकारें गर्जती ॥ ३॥

## प्रदक्षिणा २१८.

धन्य धन्य हे प्रदक्षिणा सद्गुरुरायाची। झाली त्वरा सुरवरां विमान उतरायाची॥ध्रु०॥ पदोपदीं अपार झाल्या पुण्याच्या राशी। सर्वहि तीर्थे घडलीं आम्हां आदिकरुनि काशी ॥१॥ मृदंग टाळ घोळ भक्त भावार्थे गाती। नामसंकीर्तनें ब्रम्हानंदें नाचती ॥ २ ॥ कोटि ब्रम्हहत्या हरती करितां दंडवत। लोटांगण घालितां मोक्ष लोळे पायांत॥ ३ ॥ गुरुभजनाचा महिमा नकळे आगमानिगमांसी। अनुभवि ते जाणती जे गुरुपदिंचे रहिवासी ॥ ४ ॥ प्रदक्षिणा करुनी देह भावें वाहिला। **श्रीरंगात्मज विठ्ठल** पुढें उभा राहिला ॥ धन्य हे० ॥ ५ ॥

## विडा कृष्णाचा २१९.

विडा घ्या हो नारायणा। कृष्णा जगत्रजीवना। विनविते रखुमाई। दासी होईन मी कान्हा ॥ विडा० ॥ ध्रु० ॥ शांति ही नागवेली। पानें घेउनियां करीं। मीपण जाळुनियां। चुना लावियेला वरी ॥ विडा० ॥ १ ॥ वासना फोडुनीयां। चूर्ण केली सुपारी। भावार्थ कापुरानें। घोळियेली निर्धारीं ॥ विडा० ॥ २ ॥ विवेककातरंग। रंगीं रंगला सुरंग ॥ वैराग्य जायफळ। मेळविलें अभंग ॥ विडा०॥ ३ ॥ दया ही जायपत्री। क्षमा लवंगा आणिल्या। सद्बुद्धी वेलदोडे। **शिवरामीं** मिळविले ॥ विडा० ॥ ४ ॥

## विठोबाची शेजारती २२०.

पावला प्रसाद आतां विठो निजावें। आपला तो श्रम कळों यतसे भावें ॥ १ ॥ आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा। पुरले

मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ २ ॥ तुह्मांसी जागविलें आह्मीं आपुलिया चाडा । शुभाशुभ कर्मे दोष हरावया पीडा ॥ ३ ॥ **तुका** म्हणे दिधलें उच्छिष्टाचें भोजन । नाहीं निबडिलें आह्मां आपुलिया भिन्न ॥ ४ ॥

## पद २२१.

आम्ही काय कुणाचें खातों रे । तो राम आम्हांला देतो रे ॥ध्रु०॥ बांधिले घुमट किल्ल्याचे तट । तयाला फुटती पिंपळ वट । तेथें कोण लावितो मोट । बुडाला पाणी घालितो ॥ १ ॥ खडक फोडितां सजिव रोडकी । पाहिली सर्वांनीं बेडकी । सिंधु नसतां तियेचे मुखीं । पाणी कोण घालितो ॥ २ ॥ पहा रे पहा मातेचिये स्तनीं । चिंतितां रक्तमांस मलखाणी । तिथें विमल दुग्ध घालोनी । कोण पोशितो ॥ ३ ॥ नसतां पाण्याचे बुडबुडे । सदासर्वदा गगन कोरडें । **दास** म्हणे जीवन चहुंकडे । पाडुनी सडे पीक उगवितो॥४॥

## पद २२२.

भजभज भव जलधिमाजि । मनुजा शिवाला ॥ध्रु०॥ धरिशिल दृढ चरणकमल । घडिभरि तरि करुनि विमल । तरिच सकल पाप शमल । त्यज रे भवाला ॥ १ ॥ सांडुनियां विषयवमन । झडकरि करिं षडरिदमन । पुजि मन हें करुनि सुमन । गिरिजाधवाला ॥ २ ॥ सावध हो करिसि काय । शंकर गुरु बाप माय । चिंतुनि **कविराय** पाय । हृदयीं निवाला ॥३॥

## पद २२३.

असा धरिं छंद । जाय तुटोनियां भवबंध ॥ ध्रु० ॥ छंद लागला टिटवीला । तिणें समुद्रही शोषिला । मैनावतिनें कृतार्थ केला । गोपीचंद ॥ जाय० ॥ १ ॥ दुधाचा सागर उपमन्युला । अढळपदावरि ध्रुव बैसला ॥ मार्कंडेयें यम हटविला । जाहला मंद ॥ २ ॥ झाले तीन देह भरताला । रावण रामरूप तो झाला । गोपी चढल्या गोलोकाला । यशोदानंद ॥ ३ ॥ आळिस भ्रमराचा अभ्यास । होतां भ्रमरपणा ये तीस । तैसा सोडुनि जीवपणास । भोगिं आनंद ॥४॥ छंदें असाध्यही साधिती । नर ते नारायणही होती । दीन जन हरी आपुला करिती । जो सुखकंद ॥ ५ ॥

## पद २२४.

रत रे रत सखया ! राघवनामीं । किति रमशिल कामीं ॥ रामनाम सुखधाम निरंतर सेवुनियां त्यज कुमति रिकामी ॥ ध्रु० ॥ नाना जन्मार्जित दुरितें जळलीं । कृत पुण्यें फळलीं । तें या नरतनुची प्राप्ती कळली । मग मति कां चळली । लाज त्याज करि काज स्मरुनि रघुराजपद विरम धन सुतधामीं ॥ १ ॥ दारादि विषयांचा भ्रमकृतवारा । समजुनि मनि थारा । सारा मायिकाचि मोहपसारा । सारा निःसारा । इष्टमित्र कुळगोत्र पुत्र सर्वथा वृथा भ्रम काकी मामी ॥ २ ॥ करणें सत्संगें गतमल करणें । शुद्धांतःकरणें । स्मरणें हित वरणें संसृति तरणें । सत्कर्माचरणें । समज करुनि हित उमज मनीं देशिकवचनें कवण कसा मी ॥ ३ ॥

ऐशा साधनेंचि बहु जन तरले । शांतीनें वरले । सहज देहत्वापासुनि सरले । निजपदिं अनुसरले । करिसि भजन तरि तरसि पितरसह येविषयीं तुज **विठ्ठल** हामी ॥ ४ ॥

## पद २२५.

मज तारिं गे अंबे जगदंबे भवानी ॥ ध्रु० ॥ लसत्सरसिजाननारविंदनेत्रे गे । चलत्कुंडल सुकुंतले सुगात्रे गे । लसन्नासिके हरप्रमोदपात्रे गे । अति जडमति विनवुं मी किति तुज भगवति चल कलगति अंबे ॥ १ ॥

## पद २२६.

हरि आला आजि घराला गे ॥ ध्रु० ॥ मुरलीवाला धरि वनमाला । मृगमद भाला कीं लक्षुनि त्याला । हा जीव निवाला ॥ १॥ नील तमाला कृत शुभगाला । निरखुनि झाला प्रमोद मनाला । विविध करणाला ॥ ३ ॥ पदनिरतांला दे अमृताला । वंदुनि त्याला **विठ्ठल** घाला । कीं तन्मय झाला ॥ ४ ॥

## पाळणा २२७.

जो जो जो जो रे कुलभूषणा । दशरथनंदना । निद्रा करिं बाळा मनमोहना । रामा लक्ष्मणा ॥ ध्रु० ॥ पाळणा लांबविला अयोध्येसी। दशरथाचे वंशीं । पुत्र जन्मला हृषीकेशी । कौसल्येचे कुशीं ॥ १ ॥ रत्नजडित पालख । झळके अमोलिक । वरती पहुडले कुळदीपक । त्रिभुवननायक ॥ २ ॥ हालवी कौसल्या सुंदरी । धरुनी ज्ञानदोरी । पुष्पें वर्षिलीं सुरवरीं । गर्जति जयजयकारीं ॥ ३ ॥ विश्वव्यापका

रघुराया । निद्रा करिं बा सखया । तुजवरि कुरवंडी करूनियां । सांडिन आपुली काया ॥ ४ ॥ येउनि वसिष्ठ सत्वर । सांगे जन्मांतर । राम परब्रह्म साचार । सातवा अवतार ॥ ५ ॥ याग रक्षुनियां अवधारा । मारुनि रजनीचरां । जाइल सीतेच्या सैंवरा । उद्धरि गौतमदारा ॥ ६ ॥ पर्णिल जानकी सुरूपा । भंगुनियां शिवचापा । रावण लज्जित महाकोपा । नव्हे पण हा सोपा ॥ ७ ॥ सिंधुजलडोही अवलीला । नामें तरतिल शिळा । त्यावर उतरोनी दयाळा । नेसी वानरमेळा ॥ ८ ॥ समूळ मर्दूनी रावण । स्थापिल बिभीषण । देव सोडवील संपूर्ण । आनंदेल त्रिभुवन ॥ ९ ॥ ऐसीं चरित्रें अपार । करील मनोहर । इतुकें ऐकूनी उत्तर । हांसले रघुवीर ॥ १० ॥ राम भावाचा भुकेला । भक्ताधीन जाला । दास विठ्ठलें ऐकिला । पाळणा गायिला ॥ ११ ॥

## पद २२८.

रामा रे मेघश्यामा रे । तनुमन वेधो तुझिया नामा रे ॥ ध्रु० ॥ देवदेवा रे देईं सेवा रे । शिव ध्यातो माझा कोण केवा रे ॥ १ ॥ दीनानाथा रे रघुनाथा रे । सनाथ करीं धरितों चरणीं माथा रे ॥२॥ महाराजा रे योगबीजा रे । दिनकर दीन मोक्षध्वजा रे ॥ ३ ॥

## पद २२९.

अचल अमर हा निगम तरुवर । आगम ताप विहार ॥ ध्रु० ॥ स्वानंदाची शीतळ सांवली । घेती मुनिजन फार ॥ अहंपणाचा

उष्णकाळ तो । सहजेंचि परिहार ॥ १ ॥ मनघोडयावर बसोनि आला स्वानुभव सरदार ॥ विचार कोरडा करीं जयाच्या । हाकित लोकाचार ॥ २ ॥ **अनंत** मुळिंचा विवाद न करी । कुसरी नामोच्चार ॥ सुख दुःखाची तोडुनि बेडी । बंदी निराकार ॥ ३ ॥

## पद २३०.

भाव नाहीं ठावा तोंचि म्हणे देव देवा ॥ ध्रु० ॥ नानाकार करी मती मंत्र ज्ञान दीक्षा ॥ तळमळ अंतरांत मागतांहि भिक्षा ॥१॥ साही मुद्रा तिन्ही मार्ग अर्धचंद्र ज्योती ॥ कोणी म्हणे औटपीठीं छिद्रविणें मोतीं ॥ २ ॥ पाहता कोण हेंचि पाहे तोचि देव आहे ॥ **अनंत**भास आत्मरूपीं नित्यानंदें पाहे ॥ ३ ॥

## पद २३१.

जिव शिव पक्षी एका वृक्षीं साक्षी तो तिसरा ॥ आपण आपुला शोध करितां कोणि नसे दुसरा ॥ ध्रु० ॥ चंचळ मानस आत्मवियोगें भाव करी नाना ॥ लौकिक लज्जेसाठीं गुंतुनि रूप नाणि ध्याना॥ अपार भवजळ विपरित योगें बुडसी अनुमाना ॥ लोभ तनूचा किमपी न सुटे सरल्या अवसाना ॥ चाल ॥ शिव होउनि शिवभजनीं असणें॥ अखंडपणाची सद्गति बा वरणें ॥ चुकवावें अंतींचें यमधरणें ॥ भजन करावें निशिदिनिं ठायीं वरुनी विचारा ॥ १ ॥ देखणियाची वेदकळा ही उपनिषदें दावी ॥ आपण आपुला संशय मानुनि भ्रांतिमध्यें गोवी ॥ विचार करितां सद्गुरुबोधें येकचि गोसावी ॥ निरंजन निरूप नामविना बा साक्षीतें भावी ॥ चाल ॥ पहातां तया तोचि

सकळां भरला । तिळभरी जागा नाचि कोठें उरला ॥ द्वैतपणाचा मळ सकळहि हरला ॥ **अनंत**वाणी अंतविणा ही निजहित उभारा ॥२॥

## पद २३२.

पार्था सांगों काय रे सुगम उपाय रे । भजनीं भरलें आत्मसुख, अनपाय रे ॥ ध्रु० ॥ देव मनोमय रे, मनहि चिन्मय रे । देवभक्त एक तेथें कैंचा ध्याता ध्येय रे ॥ १ ॥ भक्त जें जें भावी रे, देव तें तें दावी रे । देवभक्त द्वैतवार्ता, कवणें वदावी रे ॥२॥ पत्र पुष्प फळ रे, किंवा कंदमूळ रे । आवडी अर्पिती भक्ती, केवळही जळ रे॥३॥ भक्त मज दावी रे, अमृतत्वें भावीं रे । अमृताची गोडी मज, कैसी यां न व्हावी रे ॥ ४ ॥ भक्ताच्या आवडी रे, मनाच्या परवडी रे । लक्ष्मीच्या वैभवाहुनी, तेथें मज गोडी रे ॥ ५ ॥ निष्काम भजती रे, निजात्म प्रतीती रे । धावें पूर्णकाम तो मी, तयांचे संगतीं रे ॥६॥ सद्गुरु **वामन** रे होऊनी आपण रे । भक्ति निजसुख दावी, **आदि-नारायण** रे ॥ ७ ॥

## पद २३३.

हरिभक्ति लागीं, सकळहि त्यागी । धन्य तोचि जगीं विरागी रे ॥ ध्रु० ॥ हरिनाममाला, प्रिय नोहे ज्याला । प्रल्हाद त्यजी स्वपित्याला रे ॥ १ ॥ गुरुराज माये, त्यजी वना जाय । भरत सेवी रामपाय रे ॥ २ ॥ त्यजुनी स्वकांता, द्विजवरकांता । अन्न अर्पिती भगवंता रे ॥ ३ ॥ प्रियसुत भावा त्यजुनी स्वभावा । गोपी भुलल्या कृष्णदेवा रे ॥ ४ ॥ हरिविण अन्य, त्यजिती ते धन्य । **वामन** शरण अनन्य रे ॥ ५ ॥

## पद २३४.

कृष्णें जिंकिलें रे जिंकिलें रे, पावन यश जगीं अंकिलें रे ॥ ध्रु०
चांगला रे कृष्ण चांगला रे, मातंग मदें रक्तें रंगला रे ॥ १ ॥
ताडिला रे हस्ती ताडिला रे, उपडोनी दोनी दंत पाडिला रे ॥ २॥
लोटिला रे रंगीं लोटिला रे, मल्लांसी वज्रतुल्य वाटला रे ॥ ३ ॥
देखिला रे रंगीं देखिला रे, नवरसें हरि मनीं रेखिला रे ॥ ४ ॥
मारिले रे मल्ल मारिले रे, कंसराया वाग्दोषें वारिलें रे ॥ ५ ॥
तापला रे कृष्ण तापला रे, मारितां सखा मामा आपला रे ॥ ६ ॥
तोडिले रे बंध तोडिले रे, मायबाप उग्रसेना सोडिलें रे ॥ ७ ॥
दिधलें रे राज्य दिधलें रे, उग्रसेनमन कृष्णें वेधिलें रे ॥ ८ ॥
पावला रे जय पावला रे, श्रीकृष्ण **वामन** तो जाहला रे ॥ ९ ॥

## पद २३५.

इहीं श्रवणीं तुझें गुणनाम ऐकेन । इहीं चरणीं तीर्थपंथें चालेन ॥ नाशवंत देह कवणिये काजा । ऐशी प्रेमभक्ति देईं बा सहजा ॥१॥ अखंड तुझें नाम उच्चारीं । तेणें संसारीं होय उजरी ॥ ध्रु० ॥ शालिग्राम तीर्थें करीन आंघोळी । हरिदासाचे चरणरज लावीन कपाळीं । कंठ मंडित तुळसीमाळीं । तनुमनु प्राणें तुमतें वोवाळीं ॥ २ ॥ उदरव्यथेलागीं मी न करीं धंदा । उच्छिष्ट प्रसादें हरावी हे क्षुधा ॥ आपुली स्तुति आणि परावी निंदा । हीं दोन्ही आतळों नेदीं गोविंदा ॥ ३ ॥ सर्वां भूतीं रामा तुमतेंचि देखें । तुमचेनि प्रसादें सदा संतोषें ॥ देवा **भानुदास** मागे इतुकें । चाड नाहीं आम्हां वैकुंठलोकें ॥ ४ ॥

## पद २३६.

ज्याचे वंशीं कुळधर्म रामसेवा । त्याचे वंशीं मज जन्म दे गा देवा ॥ ध्रु० ॥ वारंवार विनंती आयकावी । दयासिंधू ही सर्व सिद्धि न्यावी ॥ १ ॥ ज्याचि वाणी रंगली रामनामा । त्यासि मजसी संवाद घडो रामा ॥ २ ॥ म्हणे **उद्धवचिद्धन** महाराजा । रामदासाचा संग घडो माझा ॥ ३ ॥

## पद २३७.

कृष्णा धांव रे ! लवकरी । संकट पडलें भारी ॥ हरि तूं आमुचा कैवारी । आलें विघ्न निवारीं ॥ ध्रु० ॥ पांडव असतां वनवासी । कळलें कौरवांसी ॥ त्यांनीं पाठविले हे ऋषी । सत्व हरायासी ॥ १॥ साठी सहस्र खंडया अन्न । दुर्वासभोजन ॥ सत्व जातील घेऊन । अंतर पडतां जाण ॥ २ ॥ रात्र जाहलीसे दोन प्रहर । आले ऋषी-श्वर ॥ भोजन मागती सत्वर । कैसा करूं विचार ॥ ३ ॥ आज कां निष्ठुर जाहलासी । कोठें गुंतलासी ॥ माझी होइल बा ! गत कैशी । अनाथ मी परदेशी ॥ ४ ॥ आतां न लावीं उशीर । धर्म चिंतातुर ॥ अनर्थ करील तो फार । एवढा करिं उपकार ॥ ५ ॥ कंठ शोषला अनंता । प्राण जाइल आतां ॥ पदर पसरितें तुज ताता । पावें रुक्मिणीकांता ॥ ६ ॥ ऐकुनि बहिणीची करुणा । आला यादवराणा ॥ द्रौपदी लोळतसे हरिचरणा । **उद्धव चिद्धन** जाणा ॥ ७ ॥

## पद २३८.

देवा ! तूं खांब सूत्रधारी रे । आह्मी बाहुल्या निर्विकारी रे॥ध्रु०॥ सकळांची कळा तुझे हातीं रे । आपल्या मतीं वर्तताती रे ॥ १ ॥

एक रंक एक राव रे । एक चोर एक साव रे ।। २ ।। **उद्धव चिद्धना** द्वैत एक रे । एक बाप एक लेंक रे ।। ३ ।।

## पद २३९.

सख्या हरि ! जेवीं रे सजणा ।। ध्रु० ।। साय दुधावरि रायपुरी वरि । कानवला चिमणा ।। १ ।। कालविला दधिभात आलें मिरें । मेळविलें लवणा ।। २ ।। **उद्धव चिद्धन** अद्वय मंचकीं । गोपाळा सगुणा ।। ३ ।।

## पद २४०.

गोड कथा रस रे । रसिकजन ! ।। ध्रु०।। आदि सुधारस षड्रस नवरस सर्वहि कुरस रे ।।१।। सुगम सुसेव्य अवीट अमोलिक न करीं आळस रे ।। २ ।। संतमुखें रस सेवित **उद्धवचिद्धन** समरस रे ।।३।।

## पद २४१.

भाळीं कस्तूरीचा टिळा । वैजयंती माळ गळां । रंग अंगीं सांवळा। कृष्णाई माझी ।। ध्रु० ।। साजिरें सुंदर ठाण । विशाळ डोळे आकर्ण । भक्तिभाव परिपूर्ण । कृष्णाई माझी ।। २ ।। पायीं पदक ऊर्ध्व रेखा । तोडरावरती वांकी देखा । कोटी शशी उपमा नखा । कृष्णाई माझी।।३।। चैतन्याची चालक सत्ता । चिद्धन विश्वाची माता । **उद्धवा** विश्रांति देता । कृष्णाई माझी ।। ४ ।।

## पद २४२.

पिब रसने रामरसातें । किति भ्रमसी भव विरसातें ।। ध्रु०।। जड तरले सागरजिवनीं । विषहरणीं शिवसंजिवनी ।। १ ।। जरि अवचट ये वदनासी । तरि कलि किल्मिष अघ नाशी ।। २ ।। कथि चिद्धन निजगुज कर्णीं । धृत **उद्धव** चिंताहरणीं ।। ३ ।।

## पद २४३.

जप तूं रामनाम किती मधुर मधुर मधुर मधुर ॥ ध्रु० ॥ रामनामध्वनि उमटे, तेथें लक्ष लावि नेटें । ब्रह्मानंद सहज भेटे, प्रचुर प्रचुर प्रचुर प्रचुर ॥ जप० ॥ १ ॥ दृश्य देखतांचि दिठी, दृष्ट द्रष्ट्यासि मिठी । आपुलें आपण सौख्य घोंटि, न दुर न दुर न दुर न दुर ॥ २ ॥ राम **विष्णुकृष्ण** ध्यान, त्यासि दे मुकुंद ज्ञान । जेणें होय समाधान, चतुर चतुर चतुर चतुर ॥ ३ ॥

## पद २४४.

धन्य एक मारुति सेवक रामाचा ॥ अन्य नाहीं त्रिभुवनीं काया मनें वाचा ॥ ध्रु० ॥ देहलंकेमाजी शोधी जाणीव सितला ॥जाणतां अशोकमुळीं भेटावया गेला ॥ १ ॥ दाविली खूण तिसी निजराममुद्रा ॥ पाहतां तन्मय झाली आनंदसमुद्रा ॥ २ ॥ अद्वय होउनी सीतारामीं लीन झाला ॥ रामनामस्मरणाचा नित्य नेम ज्याला ॥ ३॥ अभय वरद हस्त करुनियां उभा ॥ वाम कर कटिं ठेवुनि दावि दिव्य शोभा ॥ ४ ॥ मारुति संकटहरी रामभजकांचा ॥ **विष्णु कृष्ण जगन्नाथा** उपयोगी साचा ॥ ५ ॥

## भूपाळी कृष्णाची २४५.

गौळण दशवंती पैं सांगे ॥ आलिया कृष्णाचेनि मागें ॥ येणें येणें हो श्रीरंगें ॥ नवनीत भक्षिलें माझें ॥ १ ॥ तळवे तळ हात टेंकितो ॥ डाव्या गुडघ्यानें रांगतो ॥ रंगणीं रंगनाथ खेळतां ॥ आज म्यां देखिला सये ॥ २ ॥ एके हातीं लोण्याचा कवळू ॥ मुख माखिलेंस अळुमाळू ॥ चुंबन घेतां अति परिमळू ॥ नवनीताचा सये ॥ ३ ॥ येणें माझें कवाड उघाडिलें ॥ येणें माझें शिंकें गे

तोडिलें ॥ दह्या दुधाचें भाक्षिलें ॥ उलंडिलें ताकाचें ॥ ४ ॥ ऐसें जरी मी जाणतें ॥ यमुना-पाण्या नवजातें ॥ धरुनि उखळासी बांधितें ॥ शिक्षा लावितें गोविंदा ॥ ५ ऐसा पुराणप्रसिद्ध चोर । केशव नाम्याचा दातार ॥ पंढरपुरिं धरिला अवतार ॥ भक्ता पुंडलिकासाठीं ॥ ६ ॥

## भूपाळी विठ्ठलाची २४६.

उठा उठा हो मुरारी ॥ बोले रखुमाई सुंदरी ॥ भक्त गर्जती महाद्वारीं ॥ त्यांसी द्यावें दर्शन ॥ १ ॥ राउळीं जागे जाहले हरी ॥ भक्त गर्जती जयजयकारीं ॥ नारद तुंबर कीर्तन करी ॥ प्रेमें छंदें डुल्लतसे ॥ २ ॥ सर्व पूजा तुळसी-पान ॥ घेउन आले भक्तजन ॥ द्यावें तयांसी दर्शन ॥ विलंब कांहीं न करावा ॥ ३ ॥ ऐसा उगवला दिनकर ॥ भक्त गर्जती जयजयकार ॥ तेथें **गणेश** नामा किंकर ॥ हरिचरणावरि लोळतसे ॥ ४ ॥

## आरती भुवनसुंदराची २४७.

आरती भुवनसुंदराची । इंदिरावरा मुकुंदाची ॥ ध्रु० ॥ पद्मसम पादयुग्म रंगा ॥ ओंवाळणी होति भृंगा ॥ नखमणि स्रवताहे गंगा ॥ जे कां त्रिविध तापभंगा ॥ वर्तुळ गुल्फ भ्राजमाने ॥ किंकिणी क्वणित, नाद घणघणित, वाक्य रुणझुणित, नेपुरें झनन मंजिराची ॥ झननन ध्वनी मंजिराची ॥ आरती भुवनसुंदराची ॥ १ ॥ पीतपट हाटक तप्तवर्णी ॥ कांची नितंब स्वस्थानीं ॥ नाभिची अगाध हो करणी ॥ विश्वजनकाची जे जननी ॥ त्रिवली ललित उदरशोभा ॥ कंबुगळां माळ विलंबित झळाळ कौस्तुभ सरळ 'बाहु श्रीवत्स तरळ मणि मरळ कंकणाची ॥ प्रीत बहु जडित कंकणाची ॥ आरती भुवनसुंदराची ॥२॥

इंदुसम आस्य कुंदरदना ॥ अधरारुणार्क बिंबवदना ॥ पहातां भ्रांति पडे मदना ॥ सजल मेघाब्धि दैत्यदलना ॥ झळकत मकर कुंडलाभा ॥ कुटिल कुंतळीं मयूरपत्रावळी वेष्टिले तिलक भाळिं केशर झळाळित कृष्ण कस्तुरीची॥अक्षता काळि कस्तुरीची ॥ आरती भुवनसुंदराची॥३॥ कल्पद्रुमातळीं मूर्ति ॥ सौदामिनी कोटि दीप्ती ॥ गोपीगोपवलय भंवतीं ॥ त्रिविष्टप पुष्पवृष्टि करिती ॥ मंजुळ मधुर मुरलिनादें ॥ चकित गंधर्व चकित अप्सरा सुरा गिरिधरा गाउनी धराधरा कर्पुरा आरतिनें प्रेमयुक्त माचीं ॥ आरती ओंवाळित साची ॥ आरती भुवनसुंदराची ॥ ४ ॥ वृंदावनिंचे विहरणी ॥ सखे श्रीकृष्ण माय बहिणी ॥ श्रमलों भवाब्धिचे फिरणीं ॥ अतां मज ठाव देइं चरणीं ॥ अहा हे पूर्वपुण्यश्लोका ॥ नमितों चरण शरण मी करुणा येउं दे विषाणपाणी कृष्ण नेणतें बाळ आपुलें राखिं लाज त्याची ॥ दयाळा राखिं लाज त्याची ॥ आरती० ॥ ५ ॥

## पद २४८.

काया ही पंढरी धन्य सत्राविं चंद्रभागा । औटपिठा शेजारीं वस्ती करी पांडुरंगा ॥ध्रु०॥ त्रिकुटावरी श्रीहाट त्यावरि तिसरें गोल्हाट । औटपिठावरी विठ्ठल उभा असे नीट ॥ समचरण समत्र फांकती प्रभा रवी कोट । अर्धनारी नटेश्वर बोलताति श्रेष्ठ ॥ तो श्रीगुरुनीं नयनिं दाविला निजला कीं जागा ॥ १ ॥ तुर्या ते उन्मनि रुक्मिणी कमळादि माय । मन इंद्रियांसहित वळल्या वेणुनाद गाय ॥ अनुहात मुरलि ऐकोनी जालों भुजंगा ॥ २ ॥ विवेक आणि वैराग्य गरुड मारुति हेचि दोनी । अनुताप तो नारद भाव पुंडलीक मुनी ॥ पश्चाळें तें तळें शुषुम्ना संगम त्रिवेणी । अहं सोहं ज्ञानाचि पायरी जाणताति

ज्ञानीं ॥ स्नान घडो प्राणियां सर्वही दोष जाति भंगा ॥ ३ ॥ देहांत त्रिठ्ठल ओळखुनि मग जा पंढरपुरा । जन्मा येउनि कांहीं आपुलें सार्थक विचारा ॥ हरिस्वामिचा सेवक **संतू** संतांसी प्यारा । देहांत विठ्ठल ओळखुनि केला निज चरणीं थारा ॥ खुंटलें येणें खुंटलें जाणें जन्ममृत्युधागा ॥ ४ ॥ **पद २४९.**

विठ्ठलनाम उघडा मंत्र सद्भावें जपा । जपतां जपतां हृदयीं ध्यातां खंडन होय पापा ॥ ध्रु० ॥ दीपक देखुनि पतंग आपुले भावें घालि उडी । लटकिच माया जाईल लया तोडीं प्रपंचाचि बेडी ॥ स्वानंदाचा प्याला प्यालों अमृताची गोडी । आकार निराकार ह्मणुनि मी ध्यातों स्वरूपा ॥ १ ॥ परापश्यंति मध्यम वाचा बोलति वैखरी । षडदळचक्रावरती एक सत्रावि सुंदरी ॥ जीव शिव आत्मा तेथें गुप्त ध्यान करी । जन्मा येउनि सावध व्हावें होइल गुरुकृपा ॥२॥ खेचरी भूचरी चांचरी अगोचरी अलक्ष मुद्रा लावुनि उन्मनी । अगम पिपीलिका मार्ग नामे पाहे धुंडानी ॥ सुवेचें अग्र अस्मान दरवजा येणें जालें तेथोनी । **चोखामेळा** दास हरीचा ध्यातो स्वरूपा ॥ ३ ॥

## लावणी २५०.

बा करीं बेरेंनें सार्थक जन्माचें । जंव नाहीं बोलावणें आलें यमाचें ॥ ध्रु० ॥ देह दुर्लभ नाहीं पुन्हां मिळायाचा । बहु जन्मांतीं लाभ लाभला याचा ॥ हा कल्पद्रुम कल्पिलेंच देयाचा । हा उत्तम गुण वेदही वदे याचा ॥ परि शाश्वत नोहे पळांत जायाचा ॥ क्षण-भंगुर हा बुडबुडाच तोयाचा ॥ बहु यासि रक्षितां नाहीं राहणार ॥ हा क्षणिक परी ध्रुवाचि अर्थ देणार ॥ चाल ॥ करिं स्वहित घडी हे पुन्हा न येणार ॥ घातक लोभिटपण धन-सुत-धामाचें ॥ बा झट

नव्हे गाफलपण कामाचें ॥ बा करीं० ॥ १ ॥ किति फिरसिल रे करुनी पैसा पैसा ॥ सांचिशी कुणाला मधुमाशी ऐसा ॥ जातसे कळेना तुला वृथा वैसा ॥ लोळसी विषयकर्दमीं जसा म्हैसा ॥ काळ टपतसे मुषका बोका जैसा ॥ उडि पडतांचि रे बा मग सुटसिल कैसा ॥ चाल ॥ यमदूत तुझ्या गोष्टि जाणती असक्या ॥ त्यागळीच बांधुनि नेतिल रे मुसक्या ॥ पडसिल लक्षचौऱ्यांशीं येउनि हिसक्या ॥ निघनिघ झडकरि तोडीं बंधन भ्रमाचें॥ ऐसेंचि सांगणें आहे निगमाचें॥ बा करीं. ॥ २ ॥ धनसंपति शाश्वत ह्मणसिल हे माझी ॥ पालख्या सुखासन प्यादे गजवाजी ॥ सोहिरे सखे मित्र आप्तवर्ग जी ॥ जंव वेळ बरा तोंवरि म्हणतिल जीजी ॥ मारिसी मजा सुहृदांच्या समाजीं ॥ बहु प्रिय प्रिया मानिसी मनामाजी ॥ चाल ॥ येईल घडी एकटाचि जायाची ॥ धनसंपति जेथिल तेथेंचि रहायाची ॥ प्रिय भार्या द्वारांतुनीच पहायाची ॥ जन नेऊनी दहन करीती अस्थींचर्मांचें ॥ मग तुजचि भोगणें घडेल कर्माचें ॥ बा करीं० ॥ ३ ॥ काय पडलासि रे बा विषयाच्या छंदा । तुज स्वहित कसें नकळे बुद्धी-मंदा ॥ सोडुनी जनाची स्तुति आणि निंदा । कांहिं करीं आपुल्या स्वहिताचा धंदा ॥ जा शरण त्वरें सद्गुरु रामानंदा ॥ पावसी तद्रूप-करुनि निजानंदा ॥चाल॥ आयुष्य जातसे वृथा घडि घडी ॥ बा काय मिरविसी बांधुनियां पगडी ॥ शेवटीं तनू ही जायाची उघडी । रत राघवनामीं निर्मुळ कामाचें ॥ होइल सुखदानी दर्शन रामाचें ॥ बा करीं त्वरेनें० ॥४॥

## पद २५१.

नारायण विधि नारद व्यासो स्वयंज्योतिरूपा ॥ कृपाकटाक्षें निज भजकांच्या वारिसि भवतापा ॥ ध्रु० ॥ सच्चित्सुख परमात्मा श्रीहरि

गाती उपनिषदा ॥ उपक्रम उपसंहार दाविसी आपुल्या निजपदा ॥ सृष्टि स्थिति प्रलयानें स्वरुपीं द्वैत नाहिं कदा ॥ अन्वयव्यतिरेकानें पाहतां तुझा तूंचि सदा ॥ १ ॥ दोरीवरती सर्प भासला तिमिराच्या योगें ॥ शुक्तिस्थानीं रौप्य विलोकुनि झळकतसे अंगें ॥ तैसा आत्मा नेणुनि आपणा अहंकारसंगें ॥ मानुनि त्या दास्यानें संसृति भोगुं लागे वेगें ॥ २ ॥ ऐसें फिरतां फिरतां अनंत जन्म या जीवा ॥ गेले परि मनिं विश्रांतीचा लेश नाहिं देवा ॥ योगयाग तीर्थ व्रत नेमें नपेव सुखेठवा ॥ अंतर्यामीं तुजला विसरुनि करिति बाह्य सेवा ॥ ३ ॥ तव करुणामृतवृष्टी होतां समुळ दृश्य हरपे ॥ व्यापक व्याप्या ठाव नुरुनियां मीपणही लोपे ॥ आहे नाहींपण ग्रासुनी स्वतांचि स्वस्वरुपें ॥ होउनि विचरे स्वयंनिरंजन **जनार्दनकृपें** ॥ ४ ॥

## पद २५२.

सकळ जन भाग्योदय झाला । अयोध्ये रामचंद्र आला ॥ ध्रु० ॥ जन्मोजन्मिचें पुण्य कोटी । त्यासचि होय रामभेटी । वधुनि रावणादि दुष्टांला ॥ अयोध्ये० ॥ १ ॥ थाट सुग्रिवादि वानरांचे । नाचती सन्मुख रामाचे । अशा या साधु पर्वकाळा ॥ अयोध्ये० ॥ २ ॥ साधु सद्भक्त संत येती । कीर्तनीं गजर थाट करिती । प्रेमानंद समस्तांला ॥ अयोध्ये० ॥ ३ ॥ धन्य आजि दिवस सोनियाचा । पाहिला थाट कीर्तनाचा । नित्य जन घेति दर्शनाला ॥ अयोध्ये० ॥ ४ ॥ **विष्णु कृष्ण जगन्नाथाची** । आवडी हृदयीं पूर्ण साची । न सोडी प्रेमळ भक्तांला ॥ अयोध्ये० ॥ ५ ॥

समाप्त.